






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जुलै ते सप्टेंबर २०१५



चौथ्या विश्व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. शेषराव मोरे

अंतरंग

- श्याम मनोहर
- प्रभा गणोरकर
- द. ता. भोसले
- एकनाथ पगार
- अरुण जाखडे
- दिलीप माजगावकर
- कल्पना दुधाळ
- संतोष शेलार
- शीला निपुणगे

अनुक्रमणिका




अंक क्र. ३५२, जुलै-सप्टेंबर २०१५



संपादक

**महेंद्र मुंजाळ**



संपादक मंडळ

**मनोहर सोनवणे । प्रा. सुजाता शेणई । डॉ. किसन पाटील**
**डॉ. पुरुषोत्तम काळे । नंदा सुर्वे । श्याम जोशी**



सल्लागार संपादक मंडळ

**डॉ. नीलिमा गुंडी । प्रा. रूपाली शिंदे । डॉ. कल्याणी दिवेकर**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)

अनुक्रमणिका








# अंतरंग







मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अशोक देव**

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना
सदाशिव पेठ, पुणे
४११०३०.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३५२
जुलै-सप्टेंबर २०१५

# संपादकीय

संपादकीय

महेंद्र मुंजाळ

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा अंक क्रमांक ३५२. गेल्या तीन अंकांप्रमाणेच हाही अंक वाचकांना आवडेल असा विश्वास वाटतो.

या अंकाच्या निमित्ताने अलीकडेच घडलेल्या मनाला वेदना देणाऱ्या एका घटनेचा उल्लेख करावासा वाटतो. ही घटना म्हणजे ज्येष्ठ कन्नड लेखक-विचारवंत डॉ. एम. एम. कलबुर्गी यांची झालेली हत्या. विवेकी विचारांच्या डॉ. नरेंद्र दाभोलकर आणि कॉम्रेड गोविंदराव पानसरे यांच्या हत्येनंतर त्याच पद्धतीने डॉ. कलबुर्गी यांची हत्या होणे ही धक्कादायक बाब आहे. त्याचबरोबर ज्येष्ठ लेखक भालचंद्र नेमाडे यांनाही अलीकडेच नागपूरमधील एका कार्यक्रमानंतर धमकी देणारे पत्र देण्यात आले. या घटना साहित्य-सांस्कृतिक क्षेत्राला तसेच समाजालाही हादरा देणाऱ्या आहेत. लेखक-विचारवंतांच्या अभिव्यक्ती स्वातंत्र्यावर अशा पद्धतीने घातला जाणारा घाला हा तीव्र निषेधार्ह आहे. पण वारंवार घडणाऱ्या अशा घटनांचा आता केवळ निषेध करून चालणार नाही, तर समाजातील विवेकी मंडळींनी आणि सरकारने खडबडून जागे होऊन अविवेकी शक्तींविरुद्ध लढण्यासाठी योग्य तो कृतिकार्यक्रम आखणे आवश्यक बनले आहे.

आता मराठी साहित्यविश्वातल्या अलीकडच्या काळातील काही महत्वाच्या घडामोडींवर प्रकाश.

एक म्हणजे काही महत्त्वाच्या पुरस्कारांबद्दल. मराठी कादंबरी क्षेत्रात आपल्या प्रयोगशीलतेने मौलिक अशी भर घालणारे लेखक श्याम मनोहर यांना प्रसिद्ध कन्नड कवी, नाटककार, कथालेखक आणि टीकाकार कुप्पळ्ळी वेंकटप्पा पुट्टप्पा अर्थात 'कुवेंपु' यांच्या नावाने दिला जाणारा प्रतिष्ठेचा राष्ट्रीय पुरस्कार जाहीर झाला आहे. त्याचबरोबर मराठी बालसाहित्यात दिलेल्या मौलिक योगदानासाठी जेष्ठ लेखक लीलाधर हेगडे यांना यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार, तर तरुण आश्वासक कवी वीरा राठोड यांना साहित्य अकादमीचा युवा साहित्यिक पुरस्कार जाहीर झाला आहे. मराठी साहित्यविश्वासाठी या बाबी आनंदाच्या आणि अभिमानाच्या आहेत. या सर्वांचे मन:पूर्वक अभिनंदन!

दुसरे म्हणजे महाराष्ट्र शासनाच्या साहित्य-सांस्कृतिक क्षेत्रातील विविध नियुक्त्या. यात भाषा सल्लागार समितीच्या अध्यक्षपदी संत साहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक आणि संमेलनाध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांची, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ लेखक आणि प्रकाशक बाबा भांड यांची, तर विश्वकोश निर्मिती मंडळाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ पत्रकार-संपादक दिलीप करंबेळकर यांची नियुक्ती करण्यात आली आहे. या सर्वांना तसेच या समित्यांच्या/मंडळांच्या सर्व सदस्यांना पुढील कामासाठी मन:पूर्वक शुभेच्छा!

तिसरे म्हणजे अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे चौथे विश्व मराठी साहित्य संमेलन अंदमान येथे ५ व ६ सप्टेंबर २०१५ रोजी ज्येष्ठ विचारवंत-अभ्यासक-संशोधक प्रा. शेषराव मोरे

अनुक्रमणिका

यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या ५०व्या स्मृतीस हे संमेलन समर्पित करण्यात आले होते. या निमित्ताने 'स्वा. सावरकर : व्यक्ती, विचार आणि वाङ्मय' हा सावरकरांच्या विचारविश्वावर आणि साहित्यविश्वावर दृष्टिक्षेप टाकणारा संग्राह्य विशेषांकही महामंडळाच्या वतीने प्रकाशित करण्यात आला. याचबरोबर, महामंडळाचे ८९ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनही पिंपरी-चिंचवड येथे घेण्याचे निश्चित करण्यात आले आहे. डॉ. डी. वाय. पाटील विद्यापीठाच्या वतीने ही संमेलन आयोजित केले जात आहे. साधारण जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात हे संमेलन पार पडेल.

चौथे म्हणजे प्रसिद्ध नाटककार प्र. ल. मयेकर आणि ज्येष्ठ गझलकार-कवी मनोहर रणपिसे यांचे अलीकडेच निधन झाले. मराठी साहित्य क्षेत्रात त्यांनी दिलेले योगदान निश्चितच महत्त्वाचे आहे. त्यांना भावपूर्ण आदरांजली.

आता या अंकाविषयी.

चौथ्या विश्व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. शेषराव मोरे यांनी मराठीतील वैचारिक साहित्याचे दालन समृद्ध करण्यात महत्त्वाचे योगदान दिले आहे. या निमित्ताने मोरे यांच्या संशोधकीय वाटचालीवर प्रकाश टाकणारा एक विशेष लेख या अंकात समाविष्ट करण्यात आला आहे. प्रा. मोरे यांच्या साहित्याचा विशेष अभ्यास असलेले तरुण प्राध्यापक संतोष शेलार यांनी हा लेख लिहिला आहे. त्याचबरोबर ज्येष्ठ अनुवादक वीणा आलासे यांच्या निधनाने मराठी आणि बंगाली साहित्याला जोडणारा एक महत्त्वाचा दुवा अलीकडेच निखळला. वीणा आलासे यांच्या आठवणींना उजाळा देणारा लेख अरुण जाखडे यांनी लिहिला आहे.

जगण्यात आणि लेखनात सभ्यता आणि संस्कृती यांचे नेमके स्थान काय असते, या अनुषंगाने विचार मांडणारे ज्येष्ठ लेखक श्याम मनोहर यांचे भाषण, संत नामदेवांच्या नामभक्तीचा थोडक्यात वेध घेणारा प्रा. शीला निपुणगे यांचा लेख, तर 'चित्रलिपी' या वसंत आबाजी डहाके यांच्या साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त काव्यसंग्रहाचा इंग्रजी अनुवाद करताना आलेला अनुभव मांडणारा राही डहाके यांचा लेख या अंकात वाचायला मिळेल. हे सर्वच लेख वाचकांना वेगळे भान देणारे आहेत.

गेल्या दोन अंकांत प्रसिद्ध झालेल्या 'समकालीन कवी' या मालिकेला वाचकांचा खूप चांगला प्रतिसाद मिळाला. गेल्या दोन अंकांत समकालीन महत्त्वाचे कवी श्रीधर नांदेडकर आणि दिनकर मनवर यांची मनोगते आणि त्यांच्या कवितेवर ज्येष्ठ समीक्षक-आस्वादक प्रभा गणोरकर यांचे भाष्य प्रसिद्ध झाले. या अंकात या मालिकेतला प्रभा गणोरकर यांचा तिसरा लेख- आपल्या कवितेतून अस्सल ग्रामीण वास्तव मांडणारी कवयित्री कल्पना दुधाळ यांच्या कवितेचा परामर्श घेणारा आहे. त्याचबरोबर कल्पना दुधाळ यांनीही आपल्या कवितेचा प्रवास उलगडणारे मनोगत लिहिले आहे.

कल्पक प्रकाशकांच्या विविध प्रकल्पांची ओळख करून देणारे 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरात सुजाता शेणई यांनी प्रकाशन व्यवसायात परंपरा आणि नवता यांची सांगड घालणाऱ्या 'राजहंस प्रकाशना'च्या दिलीप माजगावकर यांच्याशी संवाद साधला आहे.

साहित्य अकादमीचा युवा साहित्यिक पुरस्कार जाहीर झालेल्या वीरा राठोड यांच्या 'सेनं सायी वेस' या काव्यसंग्रहाचे अंतरंग उलगडणारा मंदा खांडगे यांचा लेख, ज्येष्ठ लेखक डॉ. द. ता. भोसले यांनी कवी सुखदेव ढाणके यांच्या 'पिंडपात' या काव्यसंग्रहाला पत्राद्वारे दिलेली उत्स्फूर्त दाद, त्याचबरोबर ज्येष्ठ समीक्षक प्रा. एकनाथ पगार यांनी डॉ. राजेंद्र सलालकर यांच्या 'रंगनाथ पठारे यांच्या साहित्यातील स्त्रीदर्शन' या ग्रंथाला लिहिलेली दीर्घ प्रस्तावना हे या अंकाचे वेगळेपण ठरावे.

याशिवाय प्रशांत बागड यांच्या 'विवादे विषादे प्रमादे प्रवासे' या कथासंग्रहावर भाष्य करणारा प्राची देशपांडे यांचा लेख, प्रा. वसंत पाटणकर यांच्या 'कवितेचा शोध' या ग्रंथाचा आस्वादमक परिचय करून देणारा डॉ. सु. म. तडकोडकर यांचा लेख, तर डॉ. अरुणा ढेरे यांनी संपादित केलेल्या 'स्त्रीलिखित मराठी कथा' या ग्रंथाचा व्यापक पट उलगडणारा अंजली कुलकर्णी यांचा लेख हेही या अंकातील वैशिष्ट्यपूर्ण लेख ठरावेत.

साहित्यविश्वातील अलीकडच्या काळातील महत्त्वाच्या घटना-घडामोडींची, ग्रंथांची नोंद घेणारा हा अंक वाचकांना भावेल अशी आशा आहे.

आपल्या प्रतिसादाच्या अपेक्षेत.

◆

**महेंद्र मुंजाळ**
**भ्रमणध्वनी : ७७४४८२४६८५**
mahendramunjal@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

# पंचवार्षिक निवडणूक (२०१६ ते २०२१)

## आजीव सभासदांना आवाहन

महाराष्ट्र साहित्य परिषदेची पंचवार्षिक निवडणूक (२०१६-२०२१) प्रक्रिया साधारण दि. १५ डिसेंबर २०१५ पासून सुरू होत आहे.

सर्व आजीव सभासदांना आवाहन आहे, की आपल्या निवासाचा पत्ता बदलला असेल किंवा पत्त्यात काही दुरुस्ती करून घ्यावयाची असेल तर दि. १ ऑक्टोबर २०१५ ते १५ नोव्हेंबर २०१५ या कालावधीत ती करून घ्यावी. बदल/दुरुस्त्या प्रत्यक्ष मसाप, पुणे कार्यालयात कार्यालयीन वेळेत (स. ९.३० ते १२, सायं. ५ ते ८) येऊन करून घ्याव्यात किंवा मुख्य कार्यालयाला पत्र पाठवून कळवावे, म्हणजे या निवडणुकीसाठी तयार होणाऱ्या मतदारयादीत आपला अचूक पत्ता समाविष्ट होऊ शकेल. सर्व सभासदांनी या कामी सहकार्य करावे, अशी नम्र विनंती.

कळावे.

आपला,
**प्रकाश पायगुडे**
(प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे)

अनुक्रमणिका



# निमित्त : विश्व साहित्य संमेलन

## संतोष शेलार




अंदमान
दि.५ व ६ सप्टेंबर २०१५

१९८०च्या नंतर जे संशोधक पुढे आले त्यात प्रा. शेषराव मोरे यांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. एखादा महत्त्वाचा ऐतिहासिक विषय निवडावा, त्याची मिळतील तितकी जास्तीत जास्त साधने (sources) परिश्रमपूर्वक गोळा करावीत, त्यातून जे निष्कर्ष हाती लागतील ते प्रचलित लोकमताचा विचार न करता प्रामाणिकपणे आणि निर्भीडपणे मांडावेत, अशी त्यांची पद्धत राहिलेली आहे. विषयाची निवड करताना ते तीन मुख्य निकष लावतात. एक म्हणजे तो विषय राष्ट्रीय वा सामाजिक दृष्टीने महत्त्वाचा असला पाहिजे. दोन- त्या विषयावर आजवरच्या अभ्यासकांनी केलेली मांडणी वा निष्कर्ष चुकीचे आहेत असे अभ्यासांती त्यांना पटले पाहिजे. तीन - तो विषय आजच्या वर्तमानासाठीही महत्त्वाचा असला पाहिजे. ऐतिहासिक वास्तव प्रामाणिकपणे मांडल्याने आपल्या लोकप्रियतेचा बळी जाणार हे त्यांनी गृहीतच धरलेले आहे. त्यातून त्यांनी अनेक गटांना दुखावूनही ठेवलेले आहे. त्यांच्या एका वृत्तपत्रीय स्तंभाचे नावच मुळी 'अप्रिय पण...' असे होते. असे असूनही त्यांच्या लिखाणावर प्रेम करणारा एक खास असा वाचकवर्ग निर्माण झाला आहे.

मोरे यांनी संशोधनक्षेत्रात पदार्पण केले तेच मुळी 'सावरकर' हा विषय घेऊन. त्यांचे पहिले दोन ग्रंथ सावरकरांवर आहेत. परिणामी, त्यांच्यावर 'सावरकरवादी' असा शिक्का पडला. याआधीसुद्धा या विषयावर विस्तृत लिखाण झाले आहे. मात्र, केवळ 'सावरकरांचा बुद्धिवाद' एवढाच विषय घेऊन तपशीलवार व साधार लेखन मोरे यांनीच केले. सावरकर




**अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे चौथे विश्व मराठी साहित्य संमेलन नुकतेच अंदमान येथे पार पडले. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या ५०व्या स्मृतीस हे संमेलन समर्पित करण्यात आले होते. या संमेलनाचे अध्यक्षस्थान ज्येष्ठ विचारवंत-अभ्यासक-संशोधक प्रा. शेषराव मोरे यांनी भूषविले. साक्षेपी व निर्भीड संशोधक अशी ओळख असलेल्या प्रा. मोरे यांनी मराठीतील वैचारिक साहित्यात मौलिक अशी भर घातली आहे. प्रा. शेषराव मोरे यांच्या संशोधकीय वाटचालीवर दृष्टिक्षेप टाकणारा लेख.**




त्यांच्या हयातीत बुद्धिवादी म्हणून प्रसिद्ध होते. सावरकरांच्या समकालीन जी पुरोगामी नि समाजवादी मंडळी होती, त्यांना सावरकरांचा हिंदुत्ववाद पसंत नसला तरी त्यांच्या समाजकारणावर आणि एकूणच बुद्धिवादी विचारपद्धतीवर ही मंडळी खूष होती. सावरकरांसारख्या बुद्धिवाद्याने स्वत:स हिंदुत्ववादी म्हणवावे याचे त्यांना वाईट वाटे. स्वातंत्र्योत्तर कालखंडात मात्र ही परिस्थिती हळूहळू पालटू लागली. समाजवादी ऊर्फ पुरोगामी आणि हिंदुत्ववादी असे साचेबद्ध ध्रुवीकरण वैचारिक क्षेत्रात होऊ लागले. वैचारिक असहिष्णुताही वाढत गेली. अशा वेळी सावरकरांसारख्या पुरोगामी पण हिंदुत्ववादी (म्हणजे हिंदुधर्मवादी नव्हे तर हिंदुहितवादी) प्रतीकाचा बळी जाणे अपरिहार्य होते. य. दि. फडके यांच्यासारख्या थोर संशोधकाने सावरकरांचे समाजकारण आणि बुद्धिवाद कमी प्रतीचा होता, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर फडके यांचा वारसा पुरोगाम्यांनी या टोकापर्यंत पुढे नेला की सावरकरांच्या जीवनातील प्रत्येक चांगली गोष्ट संशयास्पद ठरविण्यात आली.



याच काळात पुरोगामी व हिंदुत्ववादी गोटाच्या परिघावर एक छोटा अस्वस्थ गट होता. हिंदुत्ववाद्यांचा कडवेपणा व प्रतिगामी प्रवृत्ती त्याला नको होती, तर पुरोगाम्यांची मुस्लिम प्रश्न आणि एकूणच 'सेमेटिक धर्मांची आक्रमकता' याविषयी असलेली बोटचेपी भूमिकाही त्याला बरोबर वाटत नव्हती. मोरे यांनी सावरकरांना केंद्रस्थानी ठेवून ही कोंडी फोडण्याचा प्रयत्न केला. य. दि. फडक्यांसारख्या पुरोगाम्यांनी आणि सावरकर अनुयायी म्हणविणाऱ्या हिंदुत्ववाद्यांनी सावरकर विचारांचा कसा विपर्यास केला आहे याचे साधार व विस्तृत विवेचन मोरे यांनी केले. या ग्रंथाची बरीच चर्चा झाली. 'मोरे' हे नकली आडनाव असावे असाही संशय व्यक्त करण्यात आला. या ग्रंथात ज्येष्ठ अभ्यासकांवर टीका केली असल्यामुळे ते अस्वस्थ झाले. या ग्रंथात मोरे यांनी आधारासाठी खूप वेळा डॉ. आंबेडकरांचे नाव घेतले असल्यामुळे ते आंबेडकरांचे 'अपहरण' करीत आहेत, असेही आरोप झाले. डॉ. रावसाहेब कसबे यांनी विस्तृत ग्रंथ लिहून प्रतिवाद करण्याचा प्रयत्न केला. त्याचेही खंडन मोरे यांनी 'विचारकलह' या पुस्तकाद्वारे केले. सावरकरांवरील दोन ग्रंथांमुळे काही पुरोगाम्यांनी त्यांना काळ्या यादीत टाकले. सावरकरांचे समर्थन केल्यामुळे हिंदुत्ववाद्यांना बरे वाटले असले तरी मोरे यांनी मांडलेला 'सावरकर' त्यांना पटला नाही. 'सावरकरांचा बुद्धिवाद' या ग्रंथाचा परिचय वा परीक्षण हिंदुत्ववादी म्हणवणाऱ्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाले नाही. हा ग्रंथ १९८८ साली प्रकाशित झाला. तेव्हापासून अलीकडील काळापर्यंत क्वचितच त्यांना हिंदुत्ववादी गटाकडून सावरकरांवर बोलण्यासाठी आमंत्रण दिले गेले. (अलीकडील दोन-तीन वर्षांत परिस्थिती थोडीशी बदलली आहे.) त्यापैकी बहुतांश वेळा त्यांच्या व्याख्यानामुळे बोलावणाऱ्यांना पश्चात्ताप झाला. सावरकरांवरील या दोन ग्रंथांमुळे वर उल्लेखलेल्या परिघावरील अस्वस्थ गटाला मात्र बरे वाटले.

यानंतर मोरे काश्मीर प्रश्नाकडे वळले. मोरे यांचे विचार पाहता त्यांचे काश्मीर प्रश्नाकडे वळणे स्वाभाविक होते. काश्मीर येथील मुस्लिम प्रश्न, तेथील मुस्लिमांचा भारत सरकारला असलेला विरोध, काश्मीरचे पाकिस्तानबरोबर असलेले भौगोलिक संलग्नत्व, शेख अब्दुल्लांची स्वतंत्र काश्मीरची भूमिका, त्यासाठी प्रसंगी पाकिस्तानविरोध आणि भारतीय जनतेची काश्मीरविषयीची भावनिक गुंतवणूक यातून हा गुंतागुंतीचा प्रश्न निर्माण झाला आहे, अशी मांडणी मोरे यांनी केली आहे. या मांडणीमुळे परत एकदा पुरोगामी आणि

# शेषराव मोरे यांची संशोधकीय वाटचाल



हिंदुत्ववादी हे दोन्ही गट नाराज झाले. विशेष म्हणजे या ग्रंथाचा भर तटस्थपणे प्रश्नांची मांडणी करण्यावर आहे, त्यांची उत्तरे शोधण्यावर नाही. सावरकरांवरील त्यांचे ग्रंथ अतिशय तर्ककठोर असले तरीही त्यात अभिनिवेश बराच आहे. तो या ग्रंथापासून दिसणे बंद होते.

अर्थात मोरे यांना जनसामान्यांत खरी लोकप्रियता मिळाली ती त्यांच्या 'अप्रिय पण...' या वृत्तपत्रीय स्तंभलेखनामुळे. त्यांच्या धक्कादायक लेखांमुळे वाचकांत खळबळ उडाली. पुढे अभ्यासाला वेळ कमी मिळतो म्हणून त्यांनी ते स्तंभलेखन बंद केले. त्या लेखांचे पुस्तक दोन भागांत प्रकाशित झाले आहे. या लेखांतून मुस्लिम प्रश्न, हिंदुत्ववाद, सेक्युलॅरिझम, हिंदू समाजाची मानसिकता, जातीचा प्रश्न इ. गोष्टींवर त्यांनी प्रकाश टाकलेला आढळतो. तटस्थपणे एखाद्या प्रश्नाची मांडणी करणे हा प्रकार येथेही आढळतो. उदा.: पांडुरंगशास्त्री आठवले आणि मा. म. देशमुख यांचे विचार त्यांच्याच शब्दांत मांडून त्यातील समाजघातकीपणा मोरे यांनी उघड केला आहे.

यानंतर मोरे यांनी आंबेडकरांच्या सामाजिक धोरणावर प्रकाश टाकणारा चिकित्सक ग्रंथ लिहिला. बाबासाहेबांचे ध्येय स्थिर असले तरी त्यांच्या धोरणात काळानुसार बदल झाले आहेत. हा बदल केवळ विचार व कृतीपुरता मर्यादित नाही, तर त्याचा परिणाम थेट त्यांच्या इतिहासमीमांसेवरही झाला आहे. आपलेच किती तरी ऐतिहासिक सिद्धांत त्यांनी कित्येक वेळा बदलले आहेत. हा बदल का व कसा झाला याची कारणमीमांसा मोरे यांनी केली आहे. बाबासाहेबांचे लिखाण विस्तृत असल्याने व ते समोरासमोर ठेवून फारसे कोणी वाचले नसल्याने त्यांच्या लेखनात झालेले बदल वाचकाला नीट कळतच नाहीत. त्यामुळे बऱ्याचदा परस्परविरोधी विचारधारा असलेले अभ्यासक आपल्या वेगवेगळ्या (किंवा परस्परविरोधी) इतिहास मीमांसेसाठी बाबासाहेबांचा आधार घेत असतात. मोरे यांनी हे दाखवून दिले, की बाबासाहेबांचा आधार घेताना आपण कुठल्या काळातील बाबासाहेबांचा आधार घेतो याचे भान असणे आवश्यक आहे. या ग्रंथाचीही अभ्यासकांनी दखल घेतल्याचे आढळत नाही.

यानंतर मोरे यांचा 'मुस्लिम मनाचा शोध' हा ग्रंथ प्रकाशित झाला. इस्लामची शिकवणूक काय आहे व तिचा मुस्लिम समाजमानसावर काय परिणाम झाला, हा या ग्रंथाचा विषय आहे. बरेच अभ्यासक 'इस्लाम' हा कसा धर्मसहिष्णू आहे हे सांगताना ठराविक सहा-सात आयाती उद्धृत करीत असतात. या आयाती मक्काकालीन आहेत. त्या वेळी प्रेषितांची शक्तीही कमी होती. मदिनाकाळात मात्र या सर्वधर्मसमभावी भासणाऱ्या आयाती येणे बंद होऊन उघड उघड आक्रमक आयाती कशा अवतरू लागल्या हे मोरे यांनी साधार दाखवले आहे. ज्याला मुस्लिम प्रश्नाचा अभ्यास करावयाचा असेल त्याला हा ग्रंथ टाळून पुढे जाताच येणार नाही. किंबहुना हा ग्रंथ वाचल्यावर आता मुस्लिम प्रश्नाविषयी काहीही जाणणे शिल्लक उरले नाही, अशीच वाचकांची भावना होते. मोरे यांच्या एकूण संशोधनकार्यात या ग्रंथाचे स्थान सर्वोच्च आहे. इस्लाम या विषयाची मराठीत इतकी अभ्यासपूर्ण आणि मूलगामी चिकित्सा करणारा असा हा पहिलाच ग्रंथ आहे.

वरील ग्रंथात प्रेषित मुहंमदांच्या मृत्यूपर्यंतचा इतिहास दिला गेला होता. त्यांच्यानंतर सत्तेवर आलेले पहिले चार खलिफा इस्लामच्या इतिहासात आदर्श मानले जातात. या 'चार आदर्श खलिफां'वरही मोरे यांनी ग्रंथ लिहिला आहे. या खलिफांनी केलेले धर्मप्रसाराचे आणि राज्यप्रसाराचे कार्य यांचा खोलवर परामर्श या ग्रंथात ते घेतात. त्या काळातील लढाया, कत्तली, आपापसातील भांडणे हे सर्व वाचल्यावर वाचकाला आधुनिक काळातील इस्लामचा काफिरांशी व आपसात चाललेला संघर्ष आठवल्याशिवाय राहत नाही. तसेच मुस्लिम राजसत्ता आणि धर्मसत्ता एवढ्या वेगाने जगात का पसरली तेही समजते.

२००७ साली १८५७च्या उठावाला १५० वर्षे पूर्ण झाली. त्या औचित्यावर मोरे यांचा '१८५७ चा जिहाद' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. मराठीत या विषयावर याआधीही अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिले गेले आहेत. मात्र, मोरे यांनी नव्या दृष्टिकोनातून या घटनेचा अर्थ लावला. इस्लामच्या अभ्यासामुळे दृष्टीत पडलेला फरक त्यांच्या उपयोगी पडला. उठावकाळात प्रकाशित झालेले जाहीरनामे याआधीही खूप अभ्यासकांनी वाचले होते. मात्र, त्यातील इस्लामिक परिभाषा क्वचितच कोणाला समजली असेल. मोरे यांनी त्यातला धार्मिक गर्भितार्थ तर समजावून सांगितलाच, पण ते जाहीरनामे मराठीत प्रकाशित करून अभ्यासकांना/वाचकांना स्वतंत्र अर्थ काढण्यास वावही ठेवला. या उठावात ज्या मुस्लिमांनी भाग घेतला त्यांच्यावर 'वहाबी' विचारांचा प्रभाव होता. मोरे यांनी ही गोष्ट स्पष्ट करण्यासाठी उत्तर भारताचा उठावापूर्वीचा १०० वर्षांचा इतिहास सांगितला आहे. मराठीत या 'वहाबी' प्रभावाविषयी इतके सखोल पहिल्यांदाच लिहिले गेले आहे. हा ग्रंथ प्रकाशित होण्याअगोदरच लोकांच्या प्रतिक्रिया येऊ लागल्या. सावरकरांच्या १८५७ विषयक निष्कर्षांचे खंडन केल्यामुळे सावरकरवादी खोलवर दुखावले गेले, तर उठाव मुस्लिम राज्य आणण्यासाठी होता हे सांगितल्यामुळे

पुरोगामी दुखावले गेले. कोणाही अभ्यासकाने त्यांची ठामपणे बाजू घेतली नाही की कोणी त्यांचे साधार खंडनही केले नाही. झाली ती शेरेबाजी. उदा.: प्रकाश बाळ यांचा असा आरोप आहे, की सत्य सांगून मोरे हे मुस्लिम प्रतिमेचे राक्षसीकरण करीत आहेत.

या सर्व ग्रंथलेखनाबरोबरच त्यांचे विविध ठिकाणी लेख लिहिणे, व्याख्याने देणेही चालूच होते. त्यातून परिस्थिती हळूहळू बदलू लागली. त्यांचे धक्कादायक निष्कर्ष लोकांच्या पचनी पडू लागले. त्यातून त्यांची लोकप्रियता वाढू लागली. त्यांचा शिष्यसंप्रदायही वाढू लागला. विशेषत: ज्यांना हिंदुहिताची काळजी आहे असे तरुण बुद्धिवादी त्यांच्याभोवती गोळा झाले. त्यांच्या वाचकप्रियतेचा प्रत्यय त्यांच्या नव्या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या वेळी आला. २०१२ साली त्यांनी 'काँग्रेसने आणि गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?' या नावाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाच्या प्रकाशनपूर्व नोंदणीला जबरदस्त प्रतिसाद मिळाला.

७५० पृष्ठांच्या या संशोधनग्रंथाची आता तिसरी आवृत्ती प्रकाशित झाली आहे. मराठी ग्रंथविश्वातला हा एक विक्रम आहे. मोरे यांच्यावर वाचकांनी दाखवलेला तो विश्वास आहे. हा ग्रंथ मराठी चर्चाविश्वात खळबळजनक ठरला. आतापर्यंत राष्ट्रवादी असणारे मराठी मन फाळणीकडे भावनिक दृष्टीने पाहत होते. त्यामुळे फाळणीला कोण जबाबदार आहे किंवा फाळणीचे गुन्हेगार कोण, अशी चर्चा चाले. मोरे यांनी मात्र फाळणीचे श्रेय कोणाला, असा प्रश्न उपस्थित केला. या ग्रंथात १८५७ ते १९४७ या ९० वर्षांच्या काळातील हिंदू-मुस्लिम प्रश्नाचा सखोल वेध घेण्यात आला आहे. या ग्रंथात मोरे यांनी दाखवून दिले आहे, की या कालावधीत जो प्रमुख संघर्ष आहे तो ब्रिटिश विरुद्ध भारतीय असा नसून तो हिंदू विरुद्ध मुस्लिम असा होता. १८५७चा उठाव तर मुस्लिम राज्य आणण्यासाठी होताच, पण त्यानंतर मुस्लिम संघटनांनी केलेले सर्व संघर्ष हे त्यासाठीच होते. फाळणीला पर्याय म्हणून अखंड भारताच्या विविध योजना मांडण्यात आल्या होत्या. मोरे दाखवून देतात, की या सर्व योजनांमध्ये २२ टक्के मुस्लिमांना सत्तेत मात्र हिंदूंच्या बरोबरीने म्हणजे ४० ते ५० टक्के वाटा देण्यात येणार होता. केंद्र शासन दुर्बळ राहणार होते. संस्थानांच्या विलीनीकरणाची खात्री नव्हती. असा हा अखंड भारत हिंदूंसाठी प्रचंड घातक ठरला असता. महत्त्वाचे म्हणजे आज ज्या प्रकारची राज्यघटना आपल्याला दिसते आहे तशी ती बनवताच आली नसती. ते दाखवून देतात, की फाळणी मागणाऱ्या द्विराष्ट्रवादी मुसलमानांपेक्षा राष्ट्रवादी मुस्लिमांच्या अखंड भारताच्या योजना अधिक हिंदुघातक आहेत.

या ग्रंथाची महाराष्ट्रात बरीच चर्चा झाली. डॉ. सदानंद मोरे यांनी या ग्रंथाचे समर्थन केले तर बऱ्याच अभ्यासकांनी त्यास विरोध केला. या ग्रंथाची चिकित्सा व्हावी म्हणून अभ्यासकांकडून लेख मागवण्यात आले व त्यातून या ग्रंथाचा 'प्रतिवाद' ग्रंथ निर्माण केला गेला. त्यात आनंद हर्डीकर, प्रा. फकरुद्दिन बेन्नूर, डॉ. अलिम वकील, अब्दुल कादर मुकादम, श्री. मा. भावे, डॉ. के. रं. शिरवाडकर, विश्वास दांडेकर, डॉ. सदानंद मोरे, रमेश पतंगे, दिलीप करंबेळकर, डॉ. माधव गोडबोले, प्रदीप रावत इत्यादींनी योगदान दिले. मात्र, या ग्रंथातही मोरे यांच्या विरोधकांना मोरे यांनी उपस्थित केलेल्या गाभ्याच्या मुद्द्यांना भिडताच आले नाही. त्यांनी एक तर व्यक्तिगत टीका केली, स्वतंत्र मांडणी केली किंवा परिघावरच्या काही मुद्द्यांना स्पर्श केला. एकूणच हा प्रयत्न फसला.

**इतिहासलेखनपद्धती**

इतिहासलेखनाच्या बाबतीत मोरे हे प्रत्यक्षार्थवादी (positivist) पद्धतीच्या जवळ जातात. इतिहासलेखन अधिकाधिक वस्तुनिष्ठ असले पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे. पुराव्यांची सुसंगत मांडणी व तर्कशुद्ध युक्तिवाद यांच्या साहाय्याने सत्याच्या अधिकाधिक जवळ जाता येते असा त्यांचा विश्वास आहे. कोणतेही विधान पुराव्याशिवाय करावयाचे नाही अशी त्यांची शिस्त आहे. एखादे घटित (fact) प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी पुराव्यांचा डोंगर उभा केलेला असतो. परिणामी, त्यांचा एखादा पुरावा कच्चा निघाला अथवा खोडला गेला तरी त्या 'घटिता'वर त्याचा फारसा परिणाम होत नाही. (त्यांच्या वैचारिक विरोधकांनी या गोष्टीची अद्याप दखल घेतलेली नाही.) त्यांनी य. दि. फडके यांच्यावर कितीही टीका केलेली असली, तरी इतिहासलेखनशास्त्रात त्यांनी वारसा चालवला तो य. दि.चाच!

शेषराव मोरे हे दर्जेदार भाष्यकार असले तरी त्यांचा मूळ पिंड हा संशोधकाचाच आहे. त्यांच्या इतिहास संशोधनाची पद्धती नेहमी तळ गाठणारी (vertical) राहिली. त्यांच्या संशोधनाचा आवाका लक्षात घेता त्यात आंतरविद्याशाखीयता कमी राहिली असे जाणवते. (हे विधान करताना डोळ्यांसमोर कुरुंदकर आहेत.) कोणत्याही परिकल्पक (speculative) तत्त्वज्ञानावर त्यांचा विश्वास नाही. किंबहुना, अशी तत्त्वज्ञाने किंवा इझम्स वस्तुस्थिती समजून घेण्यातील एक अडसर असतात असे त्यांचे मत आहे. काही महत्त्वाच्या विश्लेषण पद्धतींकडेही त्यांनी दुर्लक्ष केल्याचे जाणवते. उदा. आर्थिक संरचनेतील बदल हा सर्व इतिहासाच्या मुळाशी असतो असे मार्क्सवादी मानतात. हो

अनुक्रमणिका

गोष्ट अतिशयोक्त असली, तरी समाजात बदल घडवणाऱ्या शक्तीपैकी आर्थिक संरचना हीसुद्धा एक शक्ती आहे हे स्वीकारण्यास प्रत्यवाय नसावा. मोरे यांच्या लेखनात या शक्तीचे अस्तित्व फारसे जाणवत नाही. याला काहीसा अपवाद 'चार आदर्श खलिफा'चा आहे.

अन्वयार्थाच्या पातळीवर इतिहास संशोधक कुठल्या ना कुठल्या कुळाची (school) परंपरा चालवीत असतो. सावरकर-कुरुंदकर-आंबेडकर (सा-कु-आं.) यांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर आहे. त्यांचा बुद्धिवाद हा दि. य. देशपांडे यांच्या जातकुळीचा आहे. त्यांचे बहुतांश निष्कर्ष कुरुंदकरांच्या निष्कर्षांशी नाते सांगतात. 'अन्वय'मधील कुरुंदकरांचा सावरकरांवरील लेख व मोरे यांचे सखोल संशोधनांती निघालेले सावरकरांविषयीचे निष्कर्ष यात खूप साम्य आहे. तसेच मोरे यांनी आंबेडकरांवर संशोधन करून जे निष्कर्ष काढले त्यांचीही बीजरूपाने मांडणी कुरुंदकरांनी केली होती. इस्लामविषयीचे त्यांचे सारे संशोधन कुरुंदकरांचाच वारसा सांगणारे आहे. मोरे यांनी 'सावरकरांचा बुद्धिवाद' या पहिल्या ग्रंथात गांधीजींच्या मुस्लिम अनुनयाच्या धोरणावर टीका केली आहे. मात्र, पुढे 'विचारकलह' या पुस्तकात गांधीजींच्या धोरणाची अपरिहार्यता व मुत्सद्दीपणा मान्य करून परत कुरुंदकर लाइन पकडली आहे. अगदी अलीकडे १८५७ बाबत त्यांनी जे निष्कर्ष काढले, त्यांच्या जवळ जाणारे लेखन कुरुंदकरांनी केले आहे. 'काँग्रेसने व गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?' या ग्रंथावरीलही कुरुंदकर आणि आंबेडकर यांचा प्रभाव स्पष्ट आहे. अर्थात हे सर्व लेखन करताना त्यांनी सावरकरांकडून घेतलेली हिंदुहिताची दृष्टी सदैव जागृत असते.

**मोरे यांनी दिलेली दृष्टी**

सामाजिक आणि वैचारिक क्षेत्रातील असे किती तरी प्रश्न आहेत की ज्याविषयी मोरे यांनी आपल्याला एक नवी दृष्टी दिली आहे. त्यातील निवडक बाबींची चर्चा इथे करीत आहे.

पहिली गोष्ट म्हणजे हिंदुधर्म आणि हिंदुहित यात केली जाणारी गल्लत. मोरे यांच्या मते ज्याला हिंदुहिताकडे लक्ष द्यायचे आहे त्याला हिंदुधर्मवादी असण्याची किंवा 'त्याला' तसे समजण्याची गरज नाही. किंबहुना हिंदुहित आणि हिंदुधर्माची तत्त्वे यात बऱ्याचदा परस्परविरोध येतो.

सेक्युलॅरिझमचा खरा अर्थ मोरे यांनीच सांगितला. घटनेचे पंचविसावे कलम आपल्याला धर्मस्वातंत्र्य देण्यासाठी अवतरलेले नसून ते मर्यादित करण्यासाठी आलेले आहे. त्यानुसार ऐहिक क्षेत्रातील धर्मसत्तेचे सर्व अधिकार काढून ते राज्याला देण्यात आलेले आहेत, हा मुद्दा त्यांनी अतिशय खणखणीतपणे व सप्रमाण मांडला. अन्यथा, हिंदुत्ववादी सोडाच, पण पुरोगाम्यांचेही या विषयावरील विवेचन गोंधळ वाढवणारेच असते.

सर्वसामान्य हिंदुमनाविषयी त्यांनी नोंदवलेले निरीक्षण असे, की तात्त्विक पातळीवर हिंदूंना हिंदुहिताचा तर सोडाच पण हिंदीहिताचा विचारसुद्धा संकुचित वाटतो. व्यावहारिक पातळीवर मात्र ते केवळ जातिहिताचा विचार करू शकतात.

इस्लामविषयक ग्रंथलेखन करून त्यांनी एक नवेच चर्चाविश्व उभे केले हे आपल्याला माहीतच आहे. इस्लामशी संबंध येऊन शेकडो वर्षे झाली तरी हिंदूंना त्याविषयी जिज्ञासा वाटली नाही. आजही हिंदूंना 'इस्लाम' समजावून सांगितला तरी फारसा कळत नाही. त्यांच्या मते याचे कारण असे, की सर्व धर्मांतील गाभ्याची तत्त्वे एकसारखीच असतात असा हिंदूंचा ठाम विश्वास असतो. तो त्यांच्या धार्मिक शिकवणीतून आलेला असतो. ते म्हणतात, की हिंदुधर्माच्या संस्कारातून (काही प्रमाणात का होईना) मुक्त झाल्याशिवाय तुम्हाला इस्लाम समजून घेताच येत नाही. आंबेडकर, सावरकर, कुरुंदकर ही मंडळी अधार्मिक असल्यामुळेच इस्लाम नीट समजावून घेऊ शकली व त्याची चिकित्सा करू शकली.

**समारोप**

एक व्यक्ती, जी नांदेड जिल्ह्यातल्या एका खेड्यात जन्माला येते. घरचे शिकू देत नाहीत म्हणून घरातून पळून जाते. सामाजिक शास्त्रांची आवड असूनही ते विषय घेता येत नाहीत. अभियांत्रिकीचा अभ्यासक्रम लादला जातो; तरीही जिद्दीने अभ्यास करून ती व्यक्ती सामाजिक शास्त्रात प्रावीण्य मिळवते. एवढेच नाही, तर अठरा-अठरा तास नियमित अभ्यास करून स्वत:च्या संशोधनाने नवे चर्चाविश्व जन्माला घालते. स्वत:च्या अप्रिय पण सत्य बोलण्याने अनेक गटांना दुखावून ठेवते, मात्र आपले व्रत सोडत नाही. या वेगळ्या वाटेने जाताना स. ह. देशपांडे यांच्यासारखे काही अपवाद वगळता त्यांस कोणाची साथ मिळत नाही. तीच व्यक्ती आज एक वाचकप्रिय संशोधक बनते. शेषराव मोरे यांचा हा सारा प्रवास अक्षरश: थक्क करून सोडणारा आहे. आणि आज तर त्यांना विश्व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद (वैचारिक/ संशोधकीय साहित्य आहे की नाही याविषयी वाद न करता) देण्यात आले आहे. मराठी विचारविश्वाच्या दृष्टीने मला हे चित्र आश्वासक वाटते.

◆

**प्रा. संतोष शेलार**
चलभाष : ९९७५१२४१२०
santoshshilahar@rediffmail.com



अनुक्रमणिका



भाषण

श्याम मनोहर



श्याम मनोहर- मराठी साहित्यविश्वातले एक महत्त्वाचे नाव. मानवी जगण्याचा आपल्या लिखाणातून सातत्याने शोध घेत राहणे, हे त्यांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. जगण्यात आणि लेखनात सभ्यता व संस्कृती यांचे स्थान काय असते, या अनुषंगाने त्यांनी मांडलेले विचार.



# कथात्म साहित्य आणि समाज

गेली काही वर्षे मी कथात्म साहित्य आणि समाज या संदर्भात सभ्यता आणि संस्कृती या दोन संकल्पना वापरत विचार करतोय. नीट जगणे आणि जाणणे या माणसाच्या दोन प्रमुख ओढी असतात.

नीट जगण्यासाठी समाजात जी व्यवस्था असते तिला सभ्यता म्हणता येईल. सभ्यतेत शाळा, महाविद्यालये, ग्रंथालये, ग्रंथ अशी जाणण्याची व्यवस्था असते. तिथे मानवजातीला आधीच ज्ञात झालेले जाणून घेता येते. ज्ञात झालेले जाणून घेण्यात तसे पाहिले तर माणसाचे बरेच आयुष्य खर्ची पडते.

मानवजातीला ज्ञातच झालेले नाही, अज्ञातच आहे, तेही जाणून घ्यायची माणसाला ओढ असते. अज्ञातातले शोधावे लागते. अज्ञातातले शोधणे या माणसाच्या ओढीला संस्कृती असे नाव देता येईल.

कथात्म साहित्यात सभ्यता असते. म्हणजे ग्रामीण सभ्यता असेल, नागरी सभ्यता असेल, आर्थिकतेवरूनची सभ्यता असेल, व्यवसायावरूनची सभ्यता असेल, विचारसरणीची सभ्यता असेल, धर्माची सभ्यता असेल, विकृतांची सभ्यता असेल, मध्ययुगीन-प्राचीन सभ्यता असेल; पूर्णतः काल्पनिक, फँटॅस्टिक सभ्यताही असू शकते.

कथात्म साहित्याला संस्कृती हेही परिमाण असते. कथात्म साहित्यात शोध घेणे, लावणे असते आणि सिद्ध करणेही असते. कथात्म साहित्यातली पात्रे शोध घेत, लावत असतात, सिद्ध करत असतात. किंवा लेखक पात्रांतर्फे शोध घेत, लावत असतो. कथात्म साहित्य म्हणजे शोध घेण्याची, लावण्याची आणि शोध



सिद्ध करण्याची अभ्यासपद्धती असते.

कथात्म साहित्य माणसाचे जगणे कसे आहे, म्हणजे सभ्यता कशी आहे याचा शोध मांडते.

माणसाला नुसते जगणे पुरेसे वाटत नाही. माणसाला अनेक कुतूहले असतात. पैकी महत्त्वाची कुतूहले असतात ती म्हणजे : १) विश्व काय आहे? २) माणूस काय आहे? ३) जीवनाचा अर्थ काय आहे?

कथात्म साहित्य सभ्यतेचा शोध लावते, तसेच या प्रश्नांचाही शोध लावते. म्हणून कथात्म साहित्य ही ज्ञानशाखा आहे.

या तीन प्रश्नांचे कुतूहल अगदी सामान्य माणसालाही असते. सामान्य माणूसही या प्रश्नांचा वेध घेत असतो, उत्तरे मांडू पाहतो. या प्रमेयावर आधुनिक कथात्म साहित्य उभे राहते.

माणूस विवेकी असतो तसाच अविवेकीही असतो. बहुतेक ज्ञानशाखा विवेकावर कार्य करतात. कथात्म साहित्यात विवेक आणि अविवेक या माणसाच्या दोन्ही गुणधर्मांचा उपयोग करून शोध लावणे व सिद्ध करणे घडते.

काही पात्रांचे जगणे मांडत माणसाबद्दलच्या काही नियमांपर्यंत येणे, जगणे मांडत जीवनापर्यंत येणे, जगण्याच्या छोट्या अवकाशापासून विश्वाच्या मोठ्या अवकाशापर्यंत येणे हे शिवधनुष्य उचलणे असते. लिखाणातला हा जीवघेण्या कसोटीचा भाग असतो. इथे सर्जनता असते. सर्जनाचे पूर्ण मेकॅनिक्स अजून मानवजातीला सापडले नाहीय. सर्जनाच्या शास्त्रात इंट्युइशन ही संकल्पना वापरली जाते. सर्व महत्त्वाच्या शोधांत इंट्युइशनचा भाग असतो, हे शोधांच्या इतिहासात नमूद झालेले आहे. इंट्युइशन कशी घडवायची याचे मेकॅनिक्स मात्र सापडलेले नाही. अंतर्मन जागे राहणे, पूर्ण जागे राहणे, बाह्य व्यवहारी मन दुय्यम होणे ही इंट्युइशनसाठी एक अट आहे, पण एकमेव अट नाही. तेवढे लेखक करू शकतो. इंट्युइशनने कोडे सुटले तर कल्पकता वापरून प्रसंग निर्माण करता येतात. वास्तवातल्या, अनुभवातल्या प्रसंगांचे कथात्मरूपी प्रसंगात रूपांतर करता येते तेव्हा कथात्म साहित्य उंच होते. एरवी काव्यमय भाषेत चिंतन घालून लेखक कथात्म साहित्यात भागवाभागवी करतो.

कल्पकता वापरून कथात्म साहित्यात पंतप्रधान हे पात्रही वापरता येईल. अनुभवाशीच निगडित राहिले तर पंतप्रधानांनीच पंतप्रधानांवरचे कथात्म साहित्य लिहायला लागेल. कथात्म साहित्यासाठी कल्पकतेची फॅकल्टी जोपासणे आवश्यक आहे. कल्पकतेनेच कथात्म साहित्याचा घाट निर्माण करता येतो.

अनुभव, कल्पकता आणि इंट्युइशन यांनी कथात्म साहित्य सिद्ध होते.

कथा, कादंबरी, कविता, नाटक, लघुनिबंध असे पारंपरिक साहित्यप्रकार आहेत. अपारंपरिक साहित्याचे, प्रकार असू शकतात, हे मोकळ्या समाजात मान्य व्हायला हवे. अपारंपरिक साहित्याचे अगदी तांत्रिकपणे प्रकार करायचे, तर मजकुराच्या लांबीवरून छोटे लिखाण आणि मोठे लिखाण असे करता येईल. ज्यांना पारंपरिक साहित्यप्रकारात लिखाण करायचे असेल त्यांनी ते करावे आणि अपारंपरिकपणे लिखाण ज्यांना करायचेय त्यांनी ते करावे. इतके सगळे सोपे आहे. नाही तरी इ .स. ३००० साली साहित्यप्रकार वेगळे असणारच. तर ते आधीच घडले तर घडू दे. उगाच आताचे उदाहरण द्यायचे, तर भारतात बुलेट ट्रेनच यायला हवी, असा हट्ट नको. बुलेट ट्रेनच्या पुढचे भारतात यायला हरकत नाही. मुख्य मुद्दा : नवीन शोधणे आणि सिद्ध करणे.

अशा प्रकारे निर्माण झालेल्या लिखाणाबद्दल मला काही मुद्दे मांडायचे आहेत.

१) वाचनीयता : वाचकाला 'वाचत राहावे पाहिजे', असे वाटायला हवे. भाषेचा आनंद वाटला पाहिजे, घाटाचा आनंद वाटला पाहिजे. 'जाणणे' घडणे, हाही वाचनीयतेमधला एक महत्त्वाचा मुद्दा आहे.

मराठी सभ्यतेत वाचनीयता यावर खूप संशोधन व्हायला हवे.

२) निवेदनासाठी प्रमाणित मराठी भाषेचा वापर हवा. प्रादेशिक भाषांमधले शब्द, लकबी मराठी भाषेत येऊन व्यापक प्रमाणित मराठी भाषा घडणे आवश्यक आहे. त्यातून इतर ज्ञानशाखांसाठी प्रमाणित मराठी भाषा तयार होऊ शकेल. कामजीवनाची प्रमाणित मराठी भाषा तयार होणेही आवश्यक आहे. संवादासाठी बोलीभाषेचा वापर जरूर योग्य ठरतो.

३) कथात्म साहित्यात विशेषणे, क्रियाविशेषणे यांना खास महत्त्व असते. कथात्म साहित्यात कोटेशन्स व उद्धृते आवश्यक आहेत. ती चिंतनातून, विशेषतः इंट्युइशनचे जेव्हा विचार सुरू होतात त्यातून येतात.

४) कथात्म साहित्याचे खास शिक्षित संपादक हवेत. विद्यापीठातून तसे अभ्यासक्रम यायला हवेत.

५) कथात्म साहित्याच्या रचनेविषयी, उद्देशाविषयी,

भाषेविषयी अनेक सिद्धांत असले पाहिजेत.

आता कथात्म लेखकाविषयी :

१) लेखक थेट तत्त्वज्ञानी नसतो, पण लेखक तत्त्वज्ञानी मनाचा असावा लागतोच. लेखकाचे मन व्यवहारी नसावे. म्हणजे 'मार्ग' काढणारे नको, तर तत्वाचाच शोध घेणारे असावे.

२) लेखकाला एक अट असते : आधी निर्माण झालेले अजिवात वापरायचे नाही. नवीनच निर्माण करायचे.

३) पूर्ण वेळ लेखक हवा. स्वातंत्र्य मिळून अडुसष्ट वर्षं होताहेत. अजून पूर्ण वेळ लेखक शक्य नसावा, ही आपल्या सभ्यतेतली कमतरता आहे. पूर्ण वेळ लेखक व्हायचे धाडस लेखक करत नाही, ही लेखक या जातीची कमतरता आहे.

४) लेखकावर बाहेरचे सेन्सॉर खूप आहेत. शिवाय लेखकावर त्याचे स्वतःचे आतले सेन्सॉरही असतात. शोध घ्यायला, सिद्ध करायला लेखक स्वतंत्र नाहीय. यावर बंड हा एक मार्ग नेहमीच आहे. होईल ते होईल! दुसरा गमतीदार मार्ग- कथात्म साहित्यात बसेल असा- मला सुचतोय. लेखकाने दोन प्रकारे लेखन करावे :

अ) सेन्सॉरकी सांभाळत लिखाण करावे. ते प्रसिद्ध होऊ शकते. आ) पूर्ण स्वातंत्र्य घेऊन लिखाण करून ठेवावे. ते पुढे प्रसिद्ध होईल. मेल्यानंतर प्रसिद्धी हे साहित्याच्या इतिहासात नवे नाहीय, आणि मेल्यावर प्रसिद्धी ही सभ्यतेत दंतकथा होते. आणि मेल्यावर प्रसिद्धी यात एक वेगळीच मजा आहे. कथात्म साहित्य जाणणारा ही मजा जिवंत असताना जाणू शकतो.

५) लेखकाचे दैनंदिन जीवन कसे असते याची माहिती समाजात नाहीय. कसे सुचते, एवढा एक प्रश्न विचारला जातो. लेखकाला लिहिताना, लिहून झाल्यावर आनंद होतो; लेखन हे आनंदाचे, स्वानंदाचे असते, असा समाजात समज असतो. लेखन हे वेदनेचे असते, दैनंदिन जीवन विस्कटवणारे असते, आरोग्यावर दुष्परिणाम करणारे असते, हे समाजात माहीत व्हायला हवे.

**माणूस विवेकी असतो तसाच अविवेकीही असतो. बहुतेक ज्ञानशाखा विवेकावर कार्य करतात. कथात्म साहित्यात विवेक आणि अविवेक या माणसाच्या दोन्ही गुणधर्मांचा उपयोग करून शोध लावणे व सिद्ध करणे घडते.**



६) कथात्म साहित्य हे इतर ज्ञानशाखांप्रमाणे अवघड असते, हे समाजात माहीत व्हायला हवे.

७) कथात्म साहित्य लिहायचे म्हणजे अनेकांनी उमेदवारी करायची असते. त्यातून एखाद-दुसरे श्रेष्ठ कथात्म साहित्य निर्माण होते.

वाचनाबद्दल :

१) कथात्म साहित्य वाचताना तर्क, कल्पनाशक्ती, काही माहिती वापरावी लागते. वाचता वाचता आपोआप कळेल, कळले पाहिजे, हा आग्रह वाचकांनी धरता कामा नये.

२) कथात्म साहित्याची रचना, भाषा, विषय, आशय हा ठराविकच, माहितीतला असावा, हा मानसिक आग्रह वाचकांनी सोडला पाहिजे.

३) या दृष्टीने वाचनकौशल्ये यावर संशोधन व्हायला पाहिजे आणि ते वाचकांपर्यंत पोचले पाहिजे.

४) घाट- भाषाशैली अशा संकल्पनांची ओळख- जाण वाचकांपर्यंत पोचली पाहिजे. त्या दृष्टीने वाचकांसाठी रसग्रहण वर्ग आयोजिले पाहिजेत.

५) गावोगावी उत्तम वाचनालये हवीत. जो वाचक वाचनालयात दोन तास घालवेल त्याला चहा-विस्किटेही द्यावीत. राजकारण्यांच्या जाहीरनाम्यांत हे का नसते?

६) कथात्म साहित्य हे जगणे, जीवन, माणूस, विश्व याबद्दल असते, हे समजण्यातही मनोरंजन असते, हे समाजात पसरले पाहिजे. मग वाचकांचे कथात्म साहित्याशी नाते जुळेल.

शेवटी दोन व्यावहारिक मुद्दे :

१) सर्व पुरस्कार टॅक्स-फ्री करावेत वा पुरस्कारकर्त्यांनी टॅक्स भरावा, वा टॅक्स कापूनची रक्कम जाहीर करावी.

२) कथात्म लेखकाला पुस्तके विकत घ्यावी लागतात, प्रवास करावा लागतो, काही संशोधन करावे लागते. हा खर्च सरकारने करमुक्त करावा.

◆

**श्याम मनोहर**

दूरभाष : ०२०-२४२२४६०२



# कवितेची सोबत जिवाभावाची

## कल्पना दुधाळ



काही वेळा आपण अशा ठिकाणी असतो की तिथून पुढचं काहीच दिसत नसतं, कळतही नसतं. मागचं थोडंफार आठवतं खरं, पण तेही तसं उपयोगाचं नसतं. आपल्या जगण्याला काहीच अर्थ नाही याची सतत जाणीव होत असते. यांत्रिकपणे काम करणं आणि फक्त दिवसामागून दिवस ढकलणं, इतकं रटाळ आयुष्य झालेलं असतं आपलं. पाठोपाठच्या दीर्घ श्वासांनी प्रत्येक क्षण मोठा मोठा होत असतो. आपण अस्वस्थपणे निव्वळ घुमं होऊन वेड्यासारखं आयुष्याकडे बघत राहतो. काय करावं ते नेमकं कळत नसतं. काही तरी करायची प्रचंड इच्छाही असते; पण परिस्थितीने आपले पाय मोडून आपल्याच हातात दिलेले असतात. घालमेल, घुसमट भोवती दाटलेली असते. अशात उजेडाची एक बारीक तिरीप येते. बरोब्बर आपल्यावर नेम धरून स्थिरावते. हळूहळू आपल्याला उजळवत राहते. भोवतीचं वातावरण निवळू लागतं. घुमेपणाला अगदी बारीक कोवळे शब्द फुटू लागतात. स्वत:चा खरा आवाज कळू लागतो. भाषा सापडू लागते. अबोलपणा, एकाकीपण अर्थपूर्ण व्यक्त होऊ लागतं. शब्दांच्या सोबतीत कधी नव्हे इतकं मन रमतं, भोवताली मिसळतं आणि मग शब्दांनाच जिवाभावाची सोबत समजून भराऱ्या घेऊ लागतं. असंच काहीसं माझ्या कवितेविषयी सांगता येईल. एखादं देखणं झाड अंगणात असावं असं सतत वाटत राहावं, आणि प्रत्यक्षात त्या झाडाने एकेका नव्या पानागणिक आपल्यालाच बहरून टाकावं तसं माझ्या कवितेबाबत झालं. पण हे सगळं काही एका क्षणात झालं नाही. असे परीक्षा घेणारे दिवस बराच काळ आयुष्यापाशी रेंगाळले आणि मग परिस्थितीनेच मार्ग दाखवत वाट मोकळी केली.

कवितेची सोबत नसती तर शेतीमातीत रुळणं फार अवघड गेलं असतं. कदाचित फार चिडचिडं, रडकं आयुष्य मी जगत राहिले असते. माझ्यासाठी माझी कविता अत्यंत जिव्हाळ्याची गोष्ट आहे. छापील अक्षरांनी आपसात



अनुक्रमणिका








बोलावं, वाटांनीच पायांसोबत चालावं किंवा घुंगरांचं पैंजण पायात असलं की आपल्याबरोबरच आणखी कुणी तरी चाललंय असं वाटतं आणि चालायचा हुरूप येतो, तसंच मला माझ्या कवितेविषयी वाटतं. लसणाची कुडी कुडी लावल्यावर मागं अक्षरंच ओळीने उगवतील असंही वाटतं. कवितेच्या कोणत्याही बाह्य रूपबंधापेक्षा अस्सल अनुभवांतून व्यक्त होणं महत्त्वाचं असतं.

कवितेचं सुचणं आणि कागदावर येईपर्यंत मनात हेलकावत राहणं याविषयी जसं थोडंफार सांगता येईल, तसंच भोवतीचं वातावरण, परिस्थिती यातली कोणती अस्वस्थता लिहिण्यास प्रवृत्त करते याबद्दल मी थोडंसं लिहिणार आहे.

मला अस्पष्ट असं काही तरी आठवतंय, की गडद रंगीत कागदाच्या घड्याघड्यांचे पंख लावलेल्या, लांब दोऱ्यांनी पाळण्यावर लोंबत्या सोडलेल्या रंगीबेरंगी हलत्या चिमण्या बघत बघत त्या धुंदीत मी झोपी जायचे. तो लयदार पाळणा, त्या कागदी चिमण्या अजूनही माझ्या पापण्यांत शाबूत आहेत असं वाटतं. बालपण फार सुखसंपन्न होतं असं नाही; पण परिस्थिती कितीही नाजूक असली तरी घरातल्या लहानग्यांना तळहातावरच्या फोडासारखं जपणाऱ्या कुटुंबात शेंडेफळ असण्याचं भाग्य मला मिळालं. एखादं खेळणं हातात येण्याआधी बाळमुठीत आली ती मातीच. शेतातच घरादारात मुलखाची कामं पडलीत आणि ती उरकता उरकता मोठी माणसं जशी बोलतात तसं बोलणं, वैतागणं ते सगळं अजूनही मस्तपैकी आठवतंय आणि एखाद्या ओळीला भुरळ घालून नव्याने वास्तवात येतंय.

बालपणी मी फार हट्टी, अबोल आणि जिद्दी होते. का कोण जाणे, कळायला लागल्यापासून मी जे काही करेन ते सर्वांच्यापेक्षा चांगलं आणि वेगळं करेन असं ठरवत होते. मला वर्गात दुसरा किंवा तिसरा नंबरही कधी येऊ द्यायचा नव्हता. पहिला म्हणजे पहिलाच! मग त्यासाठी वाट्टेल तेवढा अभ्यास, जागरणं, शाळा ते घर रोज पाच किलोमीटरची पायपीट- काहीही करायची माझी तयारी असायची. काट्याकुट्यांच्या पायवाटा, ऊन-पावसाचे दिवस, अनवाणी भटकणं, चिखलात भरलेल्या पायांना ब्रॅण्डेड बूट म्हणणं, चिंचा-बोरं-कैऱ्या-शेंगा दुसऱ्यांच्या शेतातील असल्या तरी गावातल्या मैत्रिणींना पुरवणं, सुगीच्या दिवसांत शाळा बुडवून घरच्यांना शेतातली कामं करू लागणं, हे आणि असे अनुभव गावाकडे शेतकरी कुटुंबात बालपण गेलेल्या अनेकांचे असतात तसे माझेही आहेत.

बारावीपर्यंत आमच्या गावी म्हणजे टेंभुर्णी (ता. माढा, जि. सोलापूर) इथे शिकल्यावर चुलत्यांनी पुण्यात श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला महाविद्यालयात कला

**कल्पना दुधाळ या समकालीन महत्त्वाच्या कवयित्री असून त्यांचा 'सीझर कर म्हणतेय माती' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला आहे.**

घर. एकत्र शेतकरी कुटुंब. मग घरातल्या माणसांच्या मागे मागे रांगणं, लोळणं, पाटातली मऊ माती मुठींनी अंगावर उधळणं हे नेहमीचंच. चिखलाचे लाडू, पापड-सांडगे बनवणं, रानफुलांचं पिठलं करणं, गवताच्या पानांच्या हिरव्यागार भाकरी थापणं, तोंड वाजवून ते खोटं खोटं खाण्याची ॲक्शन करणं आणि आई-आजी किंवा भावंडाना तसं करायला भाग पाडणं असं चालायचं. मातीच्या खोपींचं घर बनवलेल्या चौकोनात उठता-बसता शाखेच्या व्यावसायिक अभ्यासक्रमाला माझा प्रवेश घेतला. पुण्यात राहू लागले. मी गावाकडची असल्याने मला माझ्या भाषेची लाज वाटायची, त्यामुळे फारशी कुणाशी बोलायची नाही. मैत्रिणीही फारशा नव्हत्याच. त्यामुळे लायब्ररीतच जास्त वेळ घालवायचे. तिथेच खऱ्या अर्थाने वाचनाची गोडी लागली. त्यातही जास्त जवळच्या वाटल्या कविता. मीही मोडक्या-तोडक्या कविता लिहू लागले. तिसऱ्या वर्षी म्हणजे १९९९-२००० या वर्षीची

महाविद्यालयातील सर्वोत्कृष्ट विद्यार्थिनी म्हणून माझी निवड झाली, इथपर्यंत तिथे माझी प्रगती झाली. दरम्यान, त्या वर्षीच लग्न ठरलं व झालंही.

एका सामान्य शेतकरी कुटुंबात, जिथे सगळी धडपड पोटासाठी असते आणि कोणत्याही कामाला पर्याय नसतो, त्यात एकत्र कुटुंबातली सून म्हणून घरादारातली, शेतातली हजार कामं डोळे वटारून बघत असताना छंदबिंद जोपासणं म्हणजे भिकेचे डोहाळेच! व्यक्तिस्वातंत्र्याचा हट्ट धरणं असं काही कृषिसंस्कृतीत बसत नाही. इथे जिवावरून जीव जाणावाच लागतो. शक्य तेवढा जास्तीत जास्त समजुतदारपणा दाखवत मिळून-मिसळून राहावं लागतं. मीही तसा प्रयत्न करत सासरच्या घरात रुळू लागले. घरची दहा-बारा एकर बागायती शेती. कमीत कमी मजूर घेऊन जास्तीत जास्त कामं घरच्या माणसांनी केली तरच शेती परवडते, हे अनुभवाचे बोल मी रोज ऐकत होते. कामाचे नियम आणि शिस्तसुद्धा कडक होती. त्यात कुणाची चूक होती असं नव्हतं. घरात असं वातावरण असलं तरी मला स्वत:ची ओळख होईल असं काही तरी करायची इच्छा होती, मात्र काय करायचं ते कळत नव्हतं. कामातून तर मान वर काढायलाही सवड नव्हती. आज वांगी तोडायची-भरायची, उद्या टोमॅटोचा तोडा. परवा कशाला तरी खत टाकायचं, गवत काढायचं, गबाळं गोळा करायचं. अशा परिस्थितीत सुरुवातीला सांगितल्याप्रमाणे माझ्या मनाची अवस्था झाली होती. त्यात व्यक्त होण्यासाठी पहिल्यांदा खुणावलं ते कवितेने.

माझ्याभोवती शेतीमातीत धडपडणारी अनेक माणसं आहेत. त्यांची मातीवर श्रद्धा आहे. ज्या बोरीभडक गावात पुणे-सोलापूर हायवेलगत आमची शेती आहे आणि तिथेच सासरचं घर आहे. तिथली इतर कुटुंबंही शेतीत हेलकावे खाताना मी पाहते. एकूण, शेतीचा, ग्रामीणतेचा मोठा पटच माझ्यासमोर उलगडतोय. कधी सुखाच्या डहाळ्या तर कधी बांधावर फेकून दिलेला लालभडक टोमॅटोंचा ढीग आहे. टोमॅटोवर पडणारे काळे डाग घालवण्यासाठी औषधं आहेत पण चेहऱ्यावरचं वांग घालवण्यासाठी काही नाही. माझ्या रानातली पिकं तजेलदार येण्यासाठी रासायनिक खतं, औषधं यांचा भरपूर वापर केला जातोय; पण मातीच्या मनाचा विचार कुणी का करत नाही? माती ही सृजनाची भूमी आहे. तिच्यावर हवे तसे प्रयोग का केले जातात? माती तिचं नैसर्गिक उगवतेपण हरवून बसेल. मग काय करायचं?... असे अनेक प्रश्न मला पडायचे. रोजच्या जीवनातले कित्येक अनुभव अस्वस्थ करायचे. मग मी मुलांच्या जुन्या वह्यांत लिहून ठेवायचे-

*नवव्या महिन्यातलं गर्भार पोट सावरत चालताना*
*माझ्या वाफ्यातल्या मातीचे पापुद्रे फुगीर झालेले*
*मी बघितलं पापुद्रे उचलून*
*तर कोवळे हुंकार गर्भातून*

काही ओळी सर्रकन मनात चमकून गेल्या, की त्या लिहून ठेवण्यासाठी काही तरी निमित्त करून मी रानातून घरी यायचे आणि पटकन लिहून पुन्हा कामाला जायचे. मातीत राबून राबून मातीसारखाच रंग झालेल्या माझ्याभोवतीच्या बाया सहजपणे माझ्या कवितेत मिसळल्या...

*सहज गं सये, खुरपता खुरपता सांगावंसं वाटलं*
*खालीवर झाली माती आणि बाईचं काळीज भेटलं*
*सये गं, सृष्टीच्या उदयापासून बाईपण इथंच तळ ठोकून*
*तरीही पाऊलखुणा बुजवतच जायचं का गं*
*पाठीला काटाड्या बांधून?*

असं लिहिता लिहिता मातीशी एकरूप झालेली संस्कृती मान्य केली आणि असंख्य माणसं कवितेच्या ओळींमध्ये मिसळून गेली.

*मातीतून चालता मी*
*मातीच होउनी जाते*
*गर्भात हिरवे कोंभ*
*खुशाल उगवू देते*

असं काही सुचलं की कामालाही हुरूप यायचा. शब्दांच्या वेडाने संसार, काम सगळंच सुंदर झालं. अस्वस्थता कमी होऊ लागली. अशी सांगड घालता घालता माझ्याकडे बऱ्याच कविता तयार झाल्या. कविता-रतीचा पत्ता मिळवून मी काही कविता पाठवल्या. काही दिवसांनी एक पत्र घेऊन पोस्टमन शेतातच आला. ते पत्र संपादक पुरुषोत्तम पाटील यांचं होतं. त्यात कवितांचं कौतुक करून कविता स्वीकारत असल्याचं लिहिलं होतं. मग काय, माझा आनंद रानामाळात मावेनासा झाला. दरम्यान आणखी काही नियतकलिकांना कविता पाठवल्या. त्याही छापून आल्या. माझ्या कवितांविषयी कवी ग्रेस भरभरून बोलले याचं मोठं आश्चर्य वाटलं. सकाळ वृत्तपत्राचे संपादक उत्तम कांबळे सरांनाही मी काही कविता पाठवल्या. एके दिवशी त्यांचाही फोन आला आणि मी जे काही लिहीत आहे ते बरोबर असल्याचा विश्वास वाटला.



**कवितांमुळे मला आयुष्याकडे सकारात्मक बघता आलं. कविता लिहिणं नक्कीच सोपं नाही. घालमेल तर होतेच, पण न लिहिता यापेक्षा जास्तच होते हे अनुभवलं. कवितेमुळे रानामाळात पाय घट्ट रोवून उभं राहता आलं. अनुभवांना शब्दांत पकडता आलं. बोल बोल बोलतात शब्द, पकड म्हणतात पटापट, घुम्यासारखं फिरतात मागं, ओळख म्हणतात मनातलं, राब राब राबवतात कामं, छळ छळ छळतात शब्द, मेल्यावरही अस्थीतून घुमतील कविता आणि कामं, असं वाटत राहिलं.**

त्या कवितांवर कांबळे सरांनी सकाळ सप्तरंगमध्ये एक सुंदर लेख लिहिला. पुढे त्यांच्याच पुढाकाराने 'सीझर कर म्हणतेय माती' हा माझा पहिला कवितासंग्रह नवसिद्धांत प्रकाशनाने काढला. प्रस्तावनाही कांबळे सरांनी लिहिली होती. सर तेव्हा ठाण्याच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. त्या संग्रहावर अनेकांनी चांगलं लिहिलं. पाठोपाठ अठरा पुरस्कार या संग्रहाला मिळाले. पुरस्कार वगैरे मिळणं फार महत्त्वाचं नसतं. पण त्यामुळे एक झालं, की माझ्या लिखापढीकडे पाहण्याचा घरातल्या लोकांचा दृष्टिकोन बदलला. 'रात्रीचं जागून पुस्तकात डोकं घालण्याची काय गरज आहे?' किंवा 'कशाला पत्रावळ्या खरडते?' हे म्हणणं जरा कमी झालं.

कवितांमुळे मला आयुष्याकडे सकारात्मक बघता आलं. कविता लिहिणं नक्कीच सोपं नाही. घालमेल तर होतेच, पण न लिहिता यापेक्षा जास्तच होते हे अनुभवलं. कवितेमुळे रानामाळात पाय घट्ट रोवून उभं राहता आलं. अनुभवांना शब्दांत पकडता आलं. बोल बोल बोलतात शब्द, पकड म्हणतात पटापट, घुम्यासारखं फिरतात मागं, ओळख म्हणतात मनातलं, राब राब राबवतात कामं, छळ छळ छळतात शब्द, मेल्यावरही अस्थीतून घुमतील कविता आणि कामं, असं वाटत राहिलं.

लेकरांसारखी माया गुरा-वासरांवर करणारी माणसं माझ्याभोवती असल्याने तो लळा लावणं मी अनुभवत होते. बाजारात नेलेलं घरच्या गायीचं खोंड कसायाशिवाय कुणीही विकत घेत नाही. शेळ्या विकताना 'मामा, चार पैसे कमी द्या पण टिक्की शेरडी पाळायलाच न्या' म्हणणारा पोरगा जेव्हा तिथल्या तिथे पलटलेल्या गोष्टी बघतो तेव्हा तोही फडक्यात बांधलेल्या खेटरांना भाकरीशप्पथ म्हणतो. एका डोळ्यानं हायटेक शेती बघत आणि दुसऱ्या डोळ्यातली मूठभर माती चोळत मी भोवताल न्याहाळत होते. दुधाला भाव नसल्यानं शेणाच्या पाट्या वाहून आईच्या डोक्याला पडलेला खड्डा आणि वैरण वाहून वाकलेला बाप, उकिरड्यातला शेणाचा ढीग एवढीच कमाई मागं राहणं, जिथं दुधाला पाण्याची किंमत असते तिथं रक्ताचं पाणी करून दुधाच्या किटल्या भरण्याला अर्थ नसणं, शेतीच्या यांत्रिकीकरणानं आणि कृत्रिम रेतनानं गोऱ्हे किंवा रेडकू पाळणं निरुपयोगी होणं, दावणीची गाय आणि राबणारी बाई सारखीच वाटणं, गाव-शिवारात होणारे बदल, वाटण्यांनी तुटलेली घरं, अतोनात कष्ट करूनही शेतकऱ्यांनी कव्हरेज क्षेत्राबाहेरच असणं, साहेब झालेल्या पोरांनी गावाकडच्या आईवडिलांना न सांभाळणं, भरल्या घरात तांब्याभर पाणी द्यायलाही कुणी नसणं- असे अनेक संदर्भ कवितेत आपोआप येत गेले. कोथिंबिरीची एकेक जुडी विकताना चार पैसे मागे राहावेत म्हणून धडपडणारी माणसं जशी मी पाहतेय, तशीच ती विकत घेताना दोन रुपये वाचवण्यासाठी घासाघीस करणारी माणसं, तराजूत अजून एखादा कांदा जास्त घालावा म्हणून मामा-मावशी-आजी म्हणत गोड बोलणारी बाजारातली गिऱ्हाइकं, मी स्वत: आमच्या घरची केळी विकताना गिऱ्हाइकांनी भाव कमी करून केळी मागणं आणि एका डझनात वर अजून एखादं केळं जास्त घालावं म्हणून आग्रह करणं बघितलं तेव्हा लक्षात आलं, की इथे किंमत फक्त पैशालाच आहे.

माझ्याभोवती जे आहे, जसं आहे तसं लिहीत गेले. त्यात उसनेपणा आणला नाही की दिखाऊपणा मिसळला नाही, किंवा आक्रस्ताळेपणाने ओरडून सांगावंसं वाटलं नाही. त्या साध्या-सरळ कवितांनी मला गुंतवून ठेवलं. केवळ शेतकरी गृहिणी यापलीकडे कवयित्री म्हणून ओळख दिली. मुख्य म्हणजे माझं आतल्या आत कुढणं बाहेर

काढलं. काही समकालीन कविता वाचताना मी मलाच सापडत गेले.

मी कविता लिहिते याचा अर्थ भोवतीच्या परिस्थितीशी संवाद साधते. दिवसभर कामात गुंतलेले हात झोपताना कसे ठेवावेत असा नेहमी प्रश्न पडतो. माझी मुलं गमतीने म्हणतात- आता तू झोपताना हातात पेन घे आणि झोपेतल्या कविता लिही! खरंच, झोपेतसुद्धा कविताच रेंगाळत असतात. एका कवितेत मी लिहिलंय-

*संसाराला जीव लावला*
*की ओल्या उसन्या घ्याव्या लागत नाहीत*
*म्हणत गाडून घेते मी*
*तणानं माना मुरगाळलेल्या धानात*
*पाचवीलाच पुजलेल्या*
*न संपणाऱ्या कामात*

*शिणवटा सजवून*
*मोहरीच्या दाण्यांवर*
*शब्दांची भुरळ कोरताना*
*संसाराच्या वेडात जागीच राहते*
*मेल्यासारखी झापड लागून*
*हरवू नये कविता म्हणून*

ज्या घरात भिंतीवरचं एखादं कॅलेंडर किंवा वर्तमानपत्र यापलीकडे काही वाचण्याचा काडीचाही संबंध नव्हता त्या आमच्या घरात आज बरेचसे वाचक तयार झालेत. शेतीमातीत राबणारी माणसं एखादं पुस्तक रात्री जागून वाचतात हेसुद्धा किती स्वागतार्ह आहे! आमचं एकत्र कुटुंब, भोवतीचं वातावरण आणि कवितेने जोडलेली असंख्य माणसं हे माझ्या लेखनाचं पाठबळ आहे.

शेतातली एक बाई साहित्य अकादमीत युवा लेखक महोत्सव (फेब्रुवारी २०१४, जोधपूर, राजस्थान), भारतीय कविता- नई फसल (मार्च २०१४, दिल्ली), अखिल भारतीय लेखिका संमेलन (जानेवारी २०१५, भोपाळ, मध्य प्रदेश) अशा ठिकाणी मराठी भाषेतून निमंत्रित म्हणून जाते, मध्य प्रदेश सरकारतर्फे भारत भवन (भोपाळ) इथे बहुभाषिक कार्यक्रमात कविता सादर करते, तिथेच झालेल्या महाराष्ट्र महोत्सवात कविता वाचते, असं काही आठवलं की माझाच माझ्यावर विश्वास बसत नाही.

माझ्या कवितेने ऐकणाऱ्यांच्या डोळ्यांत तरळलेलं पाणी, माझा सत्कार होताना उपस्थित असलेल्या माझ्या आई-वडिलांचे आनंदाश्रू, मला टी.व्ही.त बघून भरभरून बोलणाऱ्या भोवतीच्या आयाबाया, केंद्रीय कृषिमंत्री असताना शरद पवार यांनी चिपळूणच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या उद्घाटनपर भाषणात माझ्या दोन कविता वाचणं, आईचं पुस्तक मुलांनी कौतुकाने वाचणं, माझा पहिला कवितासंग्रह विद्यापीठात अभ्यासक्रमाला लागणं, त्याची दुसरी आवृत्ती निघणं, मराठी कवितांचा हिंदी अनुवाद होणं- अशा अनेक घटनांनी आयुष्य किती बहरलंय हे शब्दांत पकडणं अवघड झालंय खरं. शेवटी एक कविता-

*गाभाऱ्यात प्रवेश नाही*
*हे माहीत असूनही कुठल्याशा*
*देवाला आवडतो म्हणून*
*रुईच्या पानाफुलांच्या हारासाठी*
*रानोमाळ भटकलेली आहे मी*

*आयुष्याच्या शर्यतीत*
*शेवटच्या थांब्यापर्यंत न डगमगायचा*
*विडा उचललेली*
*आणि होरपळणाऱ्या वास्तवात*
*आत्महत्येचं निमंत्रण दिलेल्या विहिरीला*
*लाथाडून परतलेली आहे मी*

*लाख बदललं असेल जग*
*पण भूमीशी बांधलेलं आयुष्य*
*समूळ तोडता येत नाही*
*साधी स्वत:ची सावली चुकवून पळता येत नाही*
*त्या सावल्यांवर*
*उजेडाइतका विश्वास ठेवलाय मी*

*अस्वस्थ वादळवाऱ्यात*
*वाफेलासुद्धा*
*पाणी होऊन परतण्याचं*
*वचन मागते मी*
*तेव्हा माझ्यातला पाण्याचा अंशही*
*सळसळतो विश्वासानं*

*कवितेच्या ओळींसारखा*

◆

**कल्पना दुधाळ**
चलभाष : ९९२३६२७२१८
dudhal.kalpana@gmail.com



# कल्पना दुधाळ
## अस्सल ग्रामीण वास्तव मांडणारी कवयित्री

कल्पना दुधाळ यांची कविता स्वयंभू आहे. त्यांच्यापूर्वी लिहिल्या गेलेल्या कवितेचे संस्कार, प्रभाव, अनुकरण यांपासून ती सर्वथैव मुक्त आहे. काही कविता लोकगीतासारख्या आहेत, पण तोही प्रभाव नाही किंवा ते अनुकरण नाही. संपूर्णपणे स्वतःच्या अस्सल अनुभूतीतून, उत्स्फूर्तपणे आलेली ही कविता. कवयित्रीची मौलिक प्रतिभा, तीव्र संवेदनाक्षमता, विश्लेषक वृत्ती आणि समकालीन पर्यावरणाचा वेध घेऊन त्यावर भाष्य करणारी चिंतनशीलता या कवितेतून पारदर्शकपणे प्रतिबिंबित होते.

कल्पना दुधाळ यांचा पहिला संग्रह 'सीझर कर म्हणतेय माती' २०१० साली प्रकाशित झाला. २०१४ साली त्याची दुसरी आवृत्ती प्रकाशित झाली. मधल्या काळात अनेक पुरस्कार या संग्रहाला मिळाले, तसेच अनेक समीक्षकांनी वृत्तपत्रांतून व नियतकालिकांतून लेख लिहून या संग्रहाला मनःपूर्वक दाद दिली.

कल्पना दुधाळ यांच्या कवितेचे वैशिष्ट्य हे आहे, की ती एकाच वेळी ग्रामीण आणि समकालीन आहे. 'ग्रामीण' या विशेषणात साधारणपणे सौंदर्यवादी असणे, शहरी किंवा नागरी वातावरणापासून दूर, रानाशिवारात रमणे, शहरातून झपाट्याने दिसेनाशी होऊ लागलेली सांस्कृतिक मूल्ये अद्यापही खेड्यांमध्ये आहेत-सांभाळली जात आहेत याविषयी अभिमान बाळगणे, खेड्यातील जीवन आणि निसर्ग याविषयी जिव्हाळा आणि प्रेम असणे, या अर्थच्छटा सामावलेल्या असतात. कल्पना दुधाळ यांच्या कवितेत यांपैकी एखादी छटा क्वचित आढळते. मराठीतील 'ग्रामीण' साहित्य मुख्यतः सौंदर्यवादी आहे, स्मरणरंजनात्मक आहे. आता नाहीशा झालेल्या किंवा नाहीशा होत चाललेल्या 'ग्रामीण संस्कृती'विषयीच्या हुरहुरीने आणि गहिवराने दाटून आलेले आहे. ग्रामीण जीवनाचे, त्यातल्या निरागसतेचे, बनेलपणाचे, भाबडेपणाचे किंवा त्यातल्या गरिबीचे, दारिद्र्याचे, विषमतेचे आपापल्या स्वभावानुसार केलेले चित्रण ग्रामीण साहित्यात आढळते. कल्पना दुधाळ यांच्या कवितेत अस्सल आणि आजचे ग्रामीण वास्तव ज्या ताकदीने प्रकटले आहे तसे मराठी ग्रामीण साहित्यविश्वात क्वचितच दिसते. याचे कारण असे, की प्रत्यक्ष ग्रामीण वास्तवात वावरणाऱ्या स्त्रीने हे वास्तव विलक्षण जातकुळीच्या संवेदनक्षमतेने टिपले आहे. आजचे ग्रामीण वास्तव टिपताना ही कवयित्री हळवी, भावुक झालेली नाही. सौंदर्यवादी ती मुळातच नाही, पण एरवी 'वास्तववादी' असणाऱ्या साहित्यात आढळणारा रखरखीतपणाही तिच्या वृत्तीत नाही. ही कवयित्री संवेदनक्षम आणि बुद्धिमान आहे. आजच्या ग्रामीण वास्तवातली स्थित्यंतरे, त्यातली विसंगती ती अगदी सहज, जाता जाता नेमकेपणाने मांडीत जाते. ही स्थित्यंतरे दाखवून देताना ती ऊरबडवेपणा करीत नाही. तथापि, बदलत्या ग्रामीण वास्तवाचा सहज स्वीकार करताना ती 'हे जे

काय चाललेले आहे ते बरोबर नाही' असा सूचक अभिप्रायही व्यक्त करते. 'कविता' हा कमालीचा कठीण आविष्कार हाती घेऊन ती कवितेचे 'कवितापण' ढळू न देता भाष्य करते, विचार व्यक्त करते, टिप्पणी करते, मूल्यभाव व्यक्त करते. ती 'आजच्या भाषेत' बोलते. आजच्या ग्रामीण भागांमध्ये, गावांमध्ये राहणाऱ्या माणसांची आधुनिक, नव्या युगाचे ठसे सहजपणे धारण करणारी भाषा आणि वागणूक ती सहजपणे मिरवते.

*'मी टाकलेली मेथी आणि कोथिंबीर*
*मागतेय माझ्याकडे,*
*युरियाचा खाऊ आणि लुसलुशीत व्हायचं स्प्रेअर*
*रखरखीत झाडाच्या सालीनं,*
*मॉइश्चरायझरचा हट्ट धरलाय*
*आणि माती अडून बसलीय, सीझर कर म्हणत.*
*मी काय करू?'*

'युरिया', 'स्प्रेअर', 'मॉइश्चरायझर', 'सीझर', 'क्रीम', 'शॅम्पू', 'कंडोम्स', 'पॅड्स', 'स्क्रीन', 'बॅलन्स आणि बॅटरी संपलेला मोबाइल'- असे कित्येक आधुनिक जगातले, शहरातले शब्द आता खेड्यापाड्यांत सहज वापरले जातात. ते ग्रामीण संस्कृतीचाही भाग बनलेले आहेत. ते कल्पना दुधाळ यांच्याही कवितेत येतात; पण ते आजकालच्या काही नव्वदोत्तरी कवींच्या कवितेत येतात, त्याप्रमाणे कृत्रिम, अकारण, उपरे वाटत नाहीत. बदललेला ग्रामीण परिवेश, परिवर्तनाच्या प्रक्रियेतून जाणारे ग्रामीण पर्यावरण त्यातून अकृत्रिमपणे अवतरत जाते.

कल्पना दुधाळ यांची कविता ग्रामीण जीवनाच्या धमन्यांमधून वाहणाऱ्या कृषिसंस्कृतीशी त्वचेसारखी जोडलेली आहे. या कृषिसंस्कृतीचे शेकडो तपशील कवितेत मिसळून गेलेले आहेत. महाराष्ट्रातल्या शेतीत पिकणारी ज्वारी, ऊस, गहू, हरभरा, मूग, करडई, तीळ, मटकी अशी पिके आणि शेतीशी जोडलेली विळा, नांगर, कुदळ, कुऱ्हाड, खुरपे, दाताळे, पहार अशी अवजारे; बैल, गाय, शेळ्या, कोंबड्या, करडं, खोंड, राघू, भोरड्या, होले असे पशुपक्षी; येसन, दावण, जू, झुली, गोठा, कासरा, मुसक्या, चुंभळ, वैरण, पेंढी, दावं, खुंट, गोचीड, गोमाश्या असे पशूंशी निगडित असणारे वस्तुजात, अशा असंख्य गोष्टींच्या तपशिलांसह हा कृषिसंस्कृतीशी निगडित असणारा ग्रामीण परिसर या कवितेत जिवंत होत जातो. परंतु परिसर, पशुपक्षी, पिके, औजारे तीच, कृषिसंस्कृतीच्या जुन्या खुणा दाखवणारी असली तरी नव्या काळाने वृत्ती मात्र बदलवल्या आहेत. माणसे बदलली आहेत, नाती दुरावली आहेत. जाणिवा बदलल्या आहेत, हिशेब बदलले आहेत. बदलाला घाई आहे, वेग आहे. आज मातीला सृजनाच्या कळा नको आहेत, ती 'सीझर कर' म्हणतेय.

*'पदवीची गुंडाळी घेऊन पोरगं घरी आल्यावर*
*शिवार सावत्र झालं...*
*...शिपायाच्या जागेसाठी पोरानं*
*एकर विकायचा विषय काढला...'*

किंवा,

*'कित्ती सोप्पंय रे राजा*
*सातबारा लिहून दिला की*
*कोणतीही नवी इंपोर्टेड चार चाकी*
*दारात उभी राहते...'*

किंवा,

*'शेताच्या वाटण्या झाल्या,*
*विहिरीवर पाळ्या बसल्या*
*आईबाप वाटून घेतले, बहिणींनी दावे लावले*
*बांध कोरून सख्खे भाऊ वैरी झाले*
*तुझ्या आईच्या, तुझ्या आईला*
*शिव्या देत अंगावर धावून आले...'*

किंवा,

*'फळं भाज्या पिकांना हंगाम डावलून*
*बारमाही केलं जात आहे.'*
*'कडुलिंबाच्या पाल्यात राख लावलेल्या उतरंडीच्या*
*सीड बँकेचं दिवाळं वाजलं आहे.'*

संवेदनशील माणसाला नकोशा झालेल्या या सर्वंकष बदलाचे नेमके वर्णन 'गाव' या कवितेतही आलेले आहे.

*'बोंडातला कापूस पिंजावा*
*तशी जमिनीवर उभी शहरं*
*रिकाम्या बोंडासारखी गावं, पऱ्हाटीला चिकटून...*
*...अंगावरून सुरवंट गेल्यानं*
*सर्वांगाला खाज सुटावी*
*तसं राजकारण गावात घुसलं...*
*...स्वातंत्र्यानं लोकशाहीच्या पदरात*
*बांधून दिलेला मुका गावानं सोडून घेतला*
*आणि सख्या वेचून भरलेला खोचा*
*संसदेत ओतला*

हा ग्रामीण विश्वात पदोपदी होत चाललेला, दिसत असलेला, जाणवत राहणारा बदल अयोग्य, अवाजवी, असंगत आहे याची जाणीव कवयित्री वारंवार व्यक्त करते.

*'रोगानं मेलेल्या कोंबड्याच्या रिकाम्या खुराड्यात*
*आता ती ससे पाळते*
*आणि अंड्यांचा ट्रे दुकानातून आणते*
*जवळच्या फाट्यावर*
*व्हेज-नॉनव्हेज ढाबा बार*
*कोपऱ्यावर वडापाव समोसा भुर्जी*
*पालाखाली उडुपी रेस्टॉरंट*
*चौकात लॉलीपॉप चायनीज नूडल्सचे गाडे*
*झाल्यापासून*
*आईच्या हाताची पार चव गेली...'*

विसंगीतचे हे रूप भीषण आहे...

पारंपरिक कृषिसंस्कृतीवर आघात करणाऱ्या आधुनिकतेचे तपशील कल्पना दुधाळ नेमकेपणाने टिपतात.

*'रासायनिक खतं, विद्राव्य खतं,*
*बुरशीनाशकं, तणनाशकं*
*ठिबकसिंचन, कृषिपर्यटन, ट्रॅक्टर,*
*मळणी-कापणी यंत्रं, ऑटोस्विच*
*बचतगट, कृषी कॉल सेंटर, हेल्पलाइन...*

तथापि, या आधुनिक, तंत्रनिष्ठ, यंत्रयुगीन संस्कृतीमुळे काय होत चालले आहे याचा विचारही कवयित्री करते आहे.

*'अकार्यक्षम आळसाच्या पांघरुणात*
*शेतीव्यवस्था' गुदमरते आहे,*

तसेच

*'बॅलन्स आणि बॅटरी संपलेल्या मोबाइलसारखी*
*बिनकामाची माणसं,*
*चावीच्या खेळण्यागत जेवढ्यास तेवढी*
*पळणारी माणसं'*

आणि *'मजुरांविना शेतीला अर्धांगवायू होतो आहे',* ही निरीक्षणेही महत्त्वाची आहेत.

*'कारखान्यातल्या जेवढ्यास तेवढ्या प्रक्रियेपेक्षा*
*माती पिकवते कित्येक पट*
*तरीही आपलं शेत बिगरशेती करण्यासाठी रोज*
*शेकडो अर्ज होतात दाखल.'*

आधुनिक काळातल्या सुधारणांशी मातीतून उगवून आलेल्या कवयित्रीला जुळवून घेता येत नाही याचे मार्मिक चित्रण 'कार्यशाळा' (अद्याप अप्रकाशित) या कवितेत येते.

*'बंदिस्त शेळीपालन ऐकून*
*कार्यशाळेतनं फिरते माघारी*
*शेलकं शेंडं खुडणाऱ्या*
*शेरडा-करडांना गोंजारून सांगते*
*सुख-दुःखाच्या गोष्टी*
*कुंडीतलं भाजीपाला व्यवस्थापन*
*सांडपाण्यावरचं किचन गार्डन बघून*
*पांगते वावरभर*
*मुलखाचा वाढून दोनच शेंगांनी लगडलेल्या*
*शेवग्यासंगं हसते खळखळून'*

आणि त्यामुळे,

*'जिवांना यंत्र समजण्याच्या*
*यंत्रात जीव भरण्याच्या*
*चक्रात अडकते दरवेळी*
*आणि अयशस्वी सहभागी म्हणून परतते*
*कार्यशाळेच्या दर सत्रातून...'*

बदलत चाललेल्या ग्रामीण संस्कृतीत आता तुटत जाणाऱ्या नात्यांच्या, माणुसकी हरवत जाण्याच्या अनेक कविता कल्पना दुधाळ यांनी लिहिल्या आहेत. 'वाटण्या', 'सायेब', 'भेडं दाणं', 'झलक', 'खोंड', 'कपिला', 'आईच्या पदराखालून' अशा अनेक.

*'उलट्या काळजाची माणसं वावरताहेत*
*जिकडं-तिकडं दिवसाढवळ्या'-*

किंवा,

*'छपरावर छत्री बसवल्यापासून पोरंसोरं मोठ्यांनीही*
*गर्दी केली...*
*पण इथे पोटातल्या कावळ्यांना*
*कुणी जरा तुकडा टाका रे,*
*गोधडीच्या तुकड्यावर मुटकुळा होऊन*
*पडलेली म्हातारी*
*ओसरीच्या कोपऱ्यात...*
*तळमळली घोटभर पाण्यासाठी*
*मॅच संपली असलं तर कुणी ओसरीवर या रे'*

शेतीत, वावरात, शिवारात असे काळीज गुंतलेल्या कवयित्रीच्या जाणिवांच्या कक्षेत शेतकऱ्यांची दुःस्थिती, शेतकऱ्यांच्या आत्महत्या, समाजव्यवस्थेने आणि शासनाने शेतकऱ्यांच्या स्थितीसंबंधी दाखवलेली अनास्था या गोष्टी येणे स्वाभाविकच आहे. 'कणसांचे मरणोत्सव', 'काय चुकलं', 'राजा', 'पेर्ते व्हा', 'खत', 'गाळ', 'दूध', 'कुसळाचं गाव', 'पोशिंदा', 'येडा बनाने का काम', 'मृद्गंध', 'भुई' अशा अनेक कवितांमधून या संवेदनक्षम कवयित्रीच्या मनात या संदर्भात विचार-जाणिवा-भावनांच्या किती छटा, किती विविध परिमाणे घेत भिरभिरत असतात ते दिसत जाते. 'शेतकऱ्यांची दुःस्थिती' किंवा



अनुक्रमणिका

त्यांच्या आत्महत्या हा या कवितांचा 'विषय' नाही, तर संवेदनाविश्वाचा तो एक अतूट, आतड्याशी गुंतलेला भाग आहे.

कल्पना दुधाळ यांची कविता वाचताना हे संवेदनक्षम मन बाईचे आहे हे सतत जाणवत राहते. ज्या नजरेने हे भोवतीचे जग, माणसे, नाती, मानवी व्यवहार न्याहाळले जात आहेत ती नजर बाईची, स्त्रीची आहे. या संदर्भात अनेक उदाहरणे देता येतील. काही कवितांना लोकसाहित्यातील स्त्रीगीतांची लय आणि नादमयता आहे.

*'सरी-वाफ्यात, कांदं लावते, बाई लावते*
*नाही कांदं ग, जीव लावते, बाई लावते*
*ऊस लावते, बेणं दाबते, बाई दाबते*
*नाही बेणं गं, मन दाबते, बाई दाबते...'*

ही स्पष्टच स्त्रीची कविता आहे. लयनादच नव्हे, वृत्ती, भावना, जाणिवाही स्त्रीच्याच आहेत. दुःखाचे रूपही स्त्रीच्या दुःखाचे आहे. 'पाऊलखुणा', 'अंश', 'बाय आणि गाय', 'झुलत्या फांदीला गं', 'खेळ' इत्यादी 'सीझर कर...' या संग्रहातल्या, तसेच 'नख नख जीव', 'पखालीचं पाणी', 'आधीच ऐकू येतं', 'अफवाही नाहीत या', 'अधांतरी' अशा अप्रकाशित कवितांतूनही ते जाणवते. अनेक कवितांतून उगवून आलेली प्रतिमासृष्टी त्यांच्याखाली असणाऱ्या स्त्रीमनाची भूमी स्पष्ट करत जाते.

'रानपाखरं येतील, घरट्यात गाणी टांगून जातील', 'दुष्काळातल्या भुईला पडलेली भेग मी, कळशीभर पाण्यासाठी लागलेली रीघ मी', 'तिळाच्या पेट्या उलट्या करून फेकलेली रिकामी गर्भाशयं', 'घड कापून नेल्यावर सुकून गेलेली कमळण', 'तान्हुल्याच्या जावळागत उगवली कोवळी रोपं'... त्यांच्या संग्रहित न झालेल्या 'सत्त्व' या पूर्ण कवितेची निर्मिती ही केवळ स्त्रीमनातून आणि तीही शेतीत राबणाऱ्या, शेतीशी-पिकांशी गर्भातूनच जुळलेल्या स्त्रीच्या वृत्तीतूनच कशी झाली आहे ते ही कविता वाचताना शब्दाशब्दांमधून जाणवते.

*'पेरणीआधी लागणीआधी*
*धण्याची मूठ मातीला देऊन*
*बजावत आले विश्वासानं,*
*माय माउले ओटी भरते, पाव गं कष्टाला*
*...घोटभर पाणी, मूठभर लाह्या-बत्ताशांनी*
*उजळव रानोमाळ*
*दर पाडव्याला दगडांना चुना लावून*
*मनोभावे शिवंवर मांडलेले*
*पाच पांडव सहावी द्रौपदी नांदू दे युगानुयुगं'*

किंवा 'शास्त्र' या (अप्रकाशित) कवितेतही बाईपण भरून आलेलं दिसतं.

*'सवाष्णीच्या ओटीत उगवण घालायची*
*म्हणून तांदूळ नको गहूच घाल*
*लेकुरवाळं हळकुंड घाल...'*

किंवा,

*'भिरभिरत्या वावटळी खिदळल्या*
*वाळायला घातलेलं लुगडं नेसून मुरडल्या*
*धुळीला पाठकुळी खांद्यावर,*
*कडंवर घेऊन, गिरकल्या उंचच उंच'*

किंवा, *'लावला नाही ढक्का कुणाच्या मायेला*
*लांड्याभोरड्यांनी चौकटीला केली घरटी*
*पायात पिल्लं सोडून*
*बिनघोर झाली कुत्रीमांजरं...'*

ही भाषा, त्यातून व्यक्त झालेली माया, जगण्यावरचे प्रेम आणि बळ देणारी श्रद्धा, रीतिभाती, जगण्याची तऱ्हा- हे सारे सारे स्त्रीशी आणि स्त्रीत्वाशी निगडित आहे.

कल्पना दुधाळ यांची कविता स्वयंभू आहे. त्यांच्यापूर्वी लिहिल्या गेलेल्या कवितेचे संस्कार, प्रभाव, अनुकरण यांपासून ती सर्वथैव मुक्त आहे. काही कविता लोकगीतासारख्या आहेत, पण तोही प्रभाव नाही किंवा ते अनुकरण नाही. संपूर्णपणे स्वतःच्या अस्सल अनुभूतीतून, उत्स्फूर्तपणे आलेली ही कविता. कवयित्रीची मौलिक प्रतिभा, तीव्र संवेदनाक्षमता, विश्लेषक वृत्ती आणि समकालीन पर्यावरणाचा वेध घेऊन त्यावर भाष्य करणारी चिंतनशीलता या कवितेतून पारदर्शकपणे प्रतिबिंबित होते. त्यांची प्रतिमासृष्टी त्यांच्या भोवतीच्या पर्यावरणातून आलेली, नवी, ताजी आहे. सौंदर्यवाद, स्त्रीवाद, देशीवाद यासारख्या 'लेबलां'मध्ये तिला बसवता येणार नाही. कारण तसा कोणताही 'आवाज' तिने लावलेला नाही. नव्वदोत्तर काळातील कवितेच्या परिसरात स्वतःची स्वतंत्र ओळख आणि अस्तित्वाचा ठसा उमटवून दाखवणारी ही कवयित्री आहे. काही कवितांमधून 'कविते'च्या स्वभावात न बसणारा कणसूर ऐकू येतो, पण पुढच्या काळात तो राहणार नाही याबद्दलची खात्रीही पहिल्या संग्रहातच प्रकटते.

या कवयित्रीचे मनापासून स्वागत. माझ्याकडूनही.

◆

**प्रभा गणोरकर**
चलभाष : ९५४५४६१७३७

अनुक्रमणिका




# रंगनाथ पठारे यांच्या साहित्यकृतीतील स्त्रीचित्रणाची चिकित्सा

राजेंद्र सलालकर यांच्या 'रंगनाथ पठारे यांच्या साहित्यातील स्त्रीदर्शन' या ग्रंथात पठारे यांच्या साहित्यातील स्त्रीपात्रांचे आकलन, विश्लेषण आणि मूल्यन मांडले आहे. स्त्रीपात्रांचे हे आकलन किंवा विश्लेषण स्त्रीकेंद्री अभ्यासाचा नमुना म्हणूनही वेगळे आहे.

'पुरुषाचे' स्त्री समजावून घेणे, स्त्रीरूपाच्या सत्त्वाचा अन्वय लावणे वेगळे असते, अशा गृहीतकावर हा अभ्यास उभारला गेला आहे. रंगनाथ पठारे हे १९८० च्या दशकात कथा-कादंबऱ्यांमधून प्रकट झाले आणि हे प्रकटीकरण दोन दशकांत अधिकाधिक ठळक होत गेले. जीवनाच्या आशयद्रव्याची, अस्तित्वस्वरूपाची गंभीर चिकित्सा ते आपल्या कथनपर साहित्यातून आणि वैचारिक भाष्यांमधून करीत आले आहेत. एरवी सामान्य किंवा फारसे महत्त्वाचे न वाटणारे घटना-प्रसंग, स्त्री-पुरुष, उक्ती या सर्वांनाच कल्पक संज्ञेच्या बळावर ते नवरूप देतात किंवा असांकेतिक अस्तित्व प्रदान करतात. विरूपांचे भाषिक पातळीवर, निवेदनाच्या खास दृष्टिकोनातून नवे आणि वेगळे दर्शनही घडवतात. औपरोधिकता, रोखठोकपणा, वक्रता या शैलीतंत्रांचा भाषिक वापरात मोठा वावर घडवून आणतात आणि कथन, निवेदन आणि भाष्यही आकर्षक बनवतात. 'कथनओघ' अशी संकल्पना स्वीकारली तर पठारे यांच्या निवेदनाची गती, आशय-तपशीलसंपृक्त हे सारेच असांकेतिक ठरते. कथा-कादंबऱ्यांतील पात्रांची भावस्थिती, निवेदक पात्रांची भावस्थिती आणि पुढे वाचकाची भावस्थिती यांच्यात देवघेव घडवून आणणारी निवेदनपद्धती पठारे यांनी खास घडविली आहे. 'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग', 'टोकदार सावलीचे वर्तमान' आणि 'नामुष्कीचे स्वगत' या साहित्यकृती निवेदन ओघाने, निवेदनातील असांकेतिक प्रकटीकरणाने वाचकाला अधिक सजग करतात, धक्के देतात. लेखकाच्या जीवन आकलनातून, दृष्टिकोनातून ही खास निवेदनपद्धती अस्तित्वात आली असावी. आधुनिकता आणि व्यक्तिस्वातंत्र्य या समकालीन मूल्यव्यवस्थांची चिकित्सा, विश्लेषण करण्याची लेखनप्रेरणा पठारे यांच्या कथनपर आविष्कारांमध्ये आहे. पठारे जवळपास चाळीस वर्षे असेच आविष्कारप्रवण राहिले आहेत. 'हारण' किंवा 'त्रिधा' या कृती वगळल्या तर त्यांनी केलेली जीवनचिकित्सा जास्तीत जास्त संवेदनशीलता तीव्र करणारी आहे.

वैशिष्ट्यपूर्ण निवेदनांनी रंगनाथ पठारे यांचे कथनपर लेखन मराठी



**डॉ. राजेंद्र सलालकर यांचा 'रंगनाथ पठारे यांच्या साहित्यातील स्त्रीदर्शन' हा ग्रंथ शब्दालय प्रकाशनाच्या वतीने नुकताच प्रकाशित झाला आहे. या ग्रंथाला ज्येष्ठ समीक्षक प्रा. एकनाथ पगार यांची प्रस्तावना लाभली आहे. सदर प्रस्तावना इथे प्रसिद्ध करीत आहोत.**





रंगनाथ पठारे यांच्या
साहित्यातील स्त्रीदर्शन
डॉ. राजेंद्र सलालकर
शब्दालय प्रकाशन
पृष्ठे : २५४
मूल्य : ३२० रुपये

कादंबरीला-कथेला नवे वळण देणारे ठरले आहे. लेखकाची नैतिकता, आशयाचे आत्मसातीकरण, देशीवादी जीवनभाव या दृष्टीने पठारे हे महत्त्वाचे कथा-कादंबरीकार ठरले आहेत. जवळजळीत भाष्ये, विलक्षण विधाने यांच्यामुळेही त्यांचे लेखन असांकेतिक बनते. अशा महत्त्वाच्या लेखकाच्या साहित्यकृतींना स्त्रीजाणिवांच्या प्रकटीकरणाच्या संदर्भात प्रस्तुत ग्रंथात प्रश्नांकित केले आहे. आशयांगांना प्रश्न विचारल्यामुळे हे लेखन विश्लेषणात्मक पद्धतीचा अवलंब करणारे झाले आहे. पठारे यांच्या साहित्यातील स्त्रीचित्रणाचे एकूण स्वरूप काय, त्यांची कोणती वैशिष्ट्ये जाणवतात, मराठी साहित्य परंपरेत पठाऱ्यांच्या साहित्यातील स्त्रीपात्रचित्रणाचे वेगळेपण काय, असे प्रश्न इथे उपस्थित करीत विश्लेषण केले आहे. 'स्त्रीवादी दृष्टिकोनातून माझं लेखन तपासलं पाहिजे' असे खुद्द पठाऱ्यांनी आक्षेपकांना सुचवलेलेही होते.

येथील विश्लेषण स्त्रीवादी दृष्टीचा संपूर्ण वापर करून झालेले नसल्यामुळे स्त्रीविषयक भूमिका उदारमतवादी, मानवतावादी, समतावादी वगैरे अशी संमिश्र विश्लेषणपद्धती इथे स्वीकारलेली आहे. पठारे हेदेखील अशा संमिश्र जीवनजाणिवांना प्रकट करीत आपली नैतिक भूमिका प्रामुख्याने निवेदक पात्राकडून वदवून घेतात. स्त्रीपात्रांचे चित्रण एक पुरुषलेखक कशा पद्धतीने करीत आहे, या जिज्ञासेची वैचारिक पातळीवरची तृप्ती इथे संशोधिली आहे. पठारे यांच्या साहित्यात स्त्रीपात्रांचे भरपूर चित्रण झाले आहे. संख्यात्मक पसाऱ्यात ते नक्की दिसते. स्त्री-पुरुष संबंधविषयक त्यांची स्वतंत्र भूमिका लौकिक लेखक म्हणून निश्चित आहेच; पण त्यांच्या पात्रांनी, निवेदकांनी (हे प्रामुख्याने पुरुष आहेत) स्त्रियांसंबंधी कोणती भूमिका निभावली आहे, स्त्रियांच्या चित्रणात भाषावापर कोणत्या प्रकारचा आहे, असे सुप्त प्रश्नही या ग्रंथात उत्तरे शोधण्याच्या प्रयत्नात आहेत. पुरुषप्रधान संस्कृती, पुरुषलेखक यांच्या प्रभावाने स्त्रीरूपांचे अस्तित्व बाधित होताना काय घडते आहे, हा शोध या ग्रंथांचा गाभा आहे. पठाऱ्यांच्या लेखनात स्त्रीपात्रांचा वावरही मोठा आहे. अगदी अलीकडचा एक कादंबरी अंश पाहू.

''...मी थोड्या अकल्पनीय स्थितीत आहे हे खरं आहे. पण जगताना अशा अकल्पनीय आणि अगम्य प्रश्नांना आपल्याला कैकदा सामोरं जावं लागतंच की! त्यांच्यातून बाहेर पडून त्यांच्यावर स्वार होण्यात तर माणसाचा पुरुषार्थ असतो ना! हा पुरुषार्थ बायकांनासुद्धा खुला आहे. कारण पुरुष या शब्दाचा एक अर्थ आत्मा असा आहे. म्हणून पुरुषार्थ म्हणजे आत्म्याचं जगण्यावर स्वार होणं होय... माझ्या अस्तित्वाच्या प्रत्येक ठिपक्यावर एक मुद्रा सतत दिसते. त्यात एक पुरुष आणि एक स्त्री एकमेकांच्या डोळ्यांत डोळे घालून नृत्य करताना दिसतात. हे दृश्य एकीकडं मला आवडत असतं आणि त्याच वेळी मला त्यांचा, विशेषतः त्यातील पुरुषाचा फार राग येत असतो. मी हजार प्रकारे कल्पना करून त्या पुरुषाच्या जागी स्वतःला ठेवायचा प्रयत्न करत असतो. मी तसं केलं तरी ती स्त्री काही माझ्या हाती लागत नाही. या स्त्रीच्या शोधात मी जगभर हिंडलो. माझं सारं आयुष्य पणाला लावलं. पण एखाद्या चपळ हरिणीसारखी ती माझ्या हातून कायम सुटत राहिली. ती जेव्हा जेव्हा मला सापडली किंवा सापडली असं मला वाटलं, तेव्हा लक्षात आलं की ती माझी स्त्री नव्हती. माझं सारं लेखन म्हणजे या स्त्रीचा शोध होता...'' (कोमल किरमिजी प्रकाश)

हे आत्मचिंतन निवेदकाचे आहे. हा निवेदक कथांतर्गत घटितांशी संबंधित आहे. त्याच्या आत्मचिंतनात घटना, व्यक्ती वगैरेंच्या पूर्वस्मृती आल्या आहेत. हा निवेदक पुरुष आहे आणि तो एक कल्पित पुरुष पात्र म्हणून, कथक म्हणून वावरत आहे. त्याची पुरुषार्थाची स्वतंत्र, त्याची खास अशी परिकल्पना आहे. 'आत्म्याचं जगण्यावर स्वार होणं म्हणजे पुरुषार्थ' अशी व्याख्या त्याने केली आहे. 'आत्मा', 'पुरुषार्थ' या संकल्पना परंपरागत अर्थाने न मांडता त्याचे गृहीतक अपरंपरागत ठरते. 'या स्त्रीच्या शोधात मी जगभर हिंडलो', 'माझं सारं लेखन म्हणजे या स्त्रीचा शोध होता' या विधानांतून स्त्रीचा, स्त्रीमनाचा शोध घेण्याची ऊर्मी दिसते. पण प्रत्येक क्षणी हे लक्षात ठेवावे लागते, की हा 'मी' म्हणजे रंगनाथ पठारे नावाचा लौकिक, प्रत्यक्षगत लेखक 'मी' नाही. लेखकाचे चरित्र आणि साहित्यकृतींचा सहजसंवाद

अनुक्रमणिका

साधणाऱ्या चरित्रात्मक आकलन पद्धतीचा येथे काही उपयोग नसतो. साहित्यकृतीचे आकलन करताना लौकिक लेखकाचा आणि साहित्यकृतीतील घटना-पात्रांचा संबंध जोडणे औचित्यपूर्ण असत नाही. तसेच लेखकाने केलेली भाषणे, मुलाखती, साहित्यकृतीबाहेरची भाष्ये यांचा फार मर्यादित स्वरूपात आकलनासाठी उपयोग होऊ शकतो. उपरोक्त उताऱ्यातील 'निवेदक मी' आणि 'लौकिक लेखक' एक नाहीत, पात्राची स्त्रीविषयक जीवनदृष्टी आणि लेखकाची (प्रत्यक्षगत) जीवनदृष्टी यांत अंतर असू शकते. लेखकनिर्मित कल्पितात, कल्पित वास्तवात ही जीवनदृष्टी अंशतः संक्रमित झालेली असते. कोणत्या जीवनाबद्दल लेखक बोलतो, का बोलतो, काय सुचवतो, कोणत्या तऱ्हेचे बोलतो, अशा उक्तींच्या आधारे प्रत्यक्षगत लेखकाच्या जीवनदृष्टीचा वेध घेता येतो. प्रस्तुत ग्रंथात स्त्रीविषयक जीवनदृष्टीचा असा वेध

कलारूपे अस्तित्वात येतात. त्यासंबंधी अंतिम भाष्ये आणि निष्कर्ष करता येणार नाहीत. प्रत्यक्षगत लेखक आपल्या काळाचे अर्थनिर्णयन करीत राहतो. अशा अर्थनिर्णयांच्या संचाचे काही विशेष आकलनाच्या टप्प्यात येत राहतात. प्रत्यक्षगत लेखकाच्या जीवनआकलनाचे विश्लेषण त्याच्या कल्पितनिर्मितीच्या आधारे व्हावे, असा प्रयत्न या ग्रंथात झाला आहे.

प्रारंभी कथा-कादंबऱ्यांमधील स्त्रीपात्रांचे स्वरूप, चित्रण यांचा तपशीलवार आढावा आला आहे. त्यात विश्लेषकवृत्तीचे उपयोजन केले आहे. त्यानंतर पठारे यांच्या निवेदक पुरुषांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन तपासला आहे. अशा तपासणीसाठी स्त्रीवादाची परिभाषा आंशिक पातळीवर उपयोजिली आहे.

स्त्री-पुरुषसमता, व्यक्तिस्वातंत्र्य अशी आधुनिक मूल्ये



**रंगनाथ पठारे यांच्या स्त्रीचित्रणाची मौलिकता मांडताना स्त्रीची जिजीविषा, सहणुकीची अफाट क्षमता, प्रतिकूलतेची लवचिकता, स्त्रीच्या दमनाचा शोध, स्त्रीविषयक जिज्ञासा अशा चित्रणसामर्थ्यांच्या जमेच्या बाजू स्पष्ट केल्या आहेत. या सकारात्मक बाजूंमागील लेखकाचा उदारमतवाद, करुणा किंवा विवेक यांची चर्चा होणे ही भावी अभ्यासाची दिशाही सुचवावीशी वाटते, किंबहुना या सूत्रांची सखोल आणि सोदाहरण चिकित्सा अधिक मौलिक ठरली असती.**

घेतलेला आहे. लेखकाचे प्रत्यक्षगत अस्तित्व आणि निवेदकाचे प्रत्यक्षगत अस्तित्व हे परस्परांची जागा घेऊ शकत नाहीत, हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे.

या ग्रंथात पंधरा साहित्यकृतींतील एकशे सत्याऐंशी स्त्री पात्रांच्या स्थिती-गतीचा स्वरूपशोध घेतला गेला आहे. या स्त्रीपात्रांसंबंधीचे वर्गीकृत तपशील संख्यात्मक निकषांवर आधारलेले आहेत. जातीनिहाय, परिसरनिहाय, नातेसंबंधनिहाय, शिक्षणनिहाय वगैरे वर्गीकरणे अभ्यास म्हणून नवी आहेत.

पुरुषकेंद्रित समाजातील 'पुरुषी' साहित्यातील स्त्रीपात्रांच्या अस्तित्वरूपाचा हा शोध आहे. एकूण ५८५ पात्रांमध्ये स्त्रियांची संख्या १८७ आहे. सांख्यकीय निकषांवर स्त्रियांचे प्रमाण ५० टक्क्यांपेक्षा कमी आहे, म्हणजेच बरोबरी नाही. परंतु माणसांची सरासरी काढता येत नाही. माणूस आणि जीवन यांच्या शोधाच्या प्रेरणेतूनच

प्रामुख्याने समोर येत असतानाच्या काळात पठारे यांची साहित्यनिर्मिती झाली आहे. १९७५ नंतरच्या काळात स्त्रीमुक्तीच्या चळवळींनी वेग घेतला, योनिशुचितेचा मुद्दा चर्चिला गेला. दरम्यानच्या काळात स्त्री-अत्याचार थांबवू पाहणारे कायदे कडक झाले. ४९८ (अ) वगैरे आणखी कडक कायदे झाले. स्त्रियांवरील अत्याचाराच्या घटनांविरोधी वातावरणही निर्माण झाले. हे अत्याचार कमी होताना मात्र दिसत नाहीत. परंपरागत पुरुषवर्चस्वादी व्यवहार सुरूच राहिले. समग्र समूहमन उन्नत व्हावे, स्त्रीचा 'व्यक्ती', 'स्वतंत्र अस्तित्व' असा विचार होणे आवश्यक आहे. 'स्त्री'-'पुरुष' हे परस्परविरोधी, स्तरभेदात्मक, स्वामी-दास अशा द्वंद्व नात्यांनीच असण्याचा सार्वत्रिक समजही झाला. 'समेट-संवाद-सहभागित्व' असे जीवनव्यवहार फारच अल्प प्रमाणात आणि क्षीण स्वरूपात दिसतात.

स्त्रीपात्रांच्या येथील विश्लेषणात पठारे यांच्या



**या ग्रंथातून पठाऱ्यांच्या साहित्यकृतींची पुन:पुन्हा वाचने होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. दर एक काळात साहित्यकृतींची पुन:पुन्हा विश्लेषणे होणे साहित्यसंस्कृतीची गतिमानता दर्शवितात. साहित्यकृतींच्या वाचनाच्या वैविध्यपूर्ण दृष्टिकोनांची निर्मिती होणे हे काव्यशास्त्राला गती देणे असते. गतिमानता निर्माण करणारा हा ग्रंथ स्वागतासाठी, चर्चेसाठी, नव्या वाचनदृष्टीसाठी प्रेरणा देणारा आहे.**

लेखनाच्या अनुषंगाने मर्यादा आणि क्षमतांचा शोध घेतलेला आहे. 'पठाऱ्यांच्या सर्व लेखनामध्ये पुरुष केंद्रस्थानी दिसतो. कारण गर्भित लेखकाला पुरुषाचे भावविश्व चित्रित करायचे आहे. त्यामुळे त्याच्या आयुष्यातील वेगवेगळ्या अनुभवांची वीण उलगडून दाखविताना त्याच्या परिप्रेक्ष्यातून झालेले दर्शन तो व्यक्त करत जातो.' किंवा 'लेखक पुरुषी निवेदकाच्या साहाय्याने तिचे चित्रण करीत असल्याने हा पुरुषी नजरेतून तिला पाहतो. तिला उपभोगण्याचा कायम प्रयत्न करतो. तिचे शरीर, सौंदर्य यांचा डोळ्यांनी मुक्तपणे उपभोग घेतो. ती पुरुषांना सुख देणारी व्यक्ती असल्याचा दृष्टिकोन सूचित होतो...' या आक्षेपांचा स्पष्टीकरणात्मक भाग या ग्रंथात प्रामुख्याने आला आहे. लेखक असण्यापेक्षा 'पुरुष लेखक', 'पुरुषकेंद्री दृष्टिकोन' असे आक्षेपांचे सूत्र आहे.

रंगनाथ पठारे यांच्या स्त्रीचित्रणाची मौलिकता मांडताना स्त्रीची जिजीविषा, सहणुकीची अफाट क्षमता, प्रतिकूलतेची लवचिकता, स्त्रीच्या दमनाचा शोध, स्त्रीविषयक जिज्ञासा अशा चित्रणसामर्थ्यांच्या जमेच्या बाजू स्पष्ट केल्या आहेत. या सकारात्मक बाजूंमागील लेखकाचा उदारमतवाद, करुणा किंवा विवेक यांची चर्चा होणे ही भावी अभ्यासाची दिशाही सुचवावीशी वाटते, किंबहुना या सूत्रांची सखोल आणि सोदाहरण चिकित्सा अधिक मौलिक ठरली असती. 'पुरुषकेंद्री' आणि 'स्त्रीकेंद्री' अशी द्वंद्वे उभारल्याने 'सहअस्तित्व समान पातळीवरचे उभे राहणे' या तत्त्वाचा शोध घेणे मागे पडते.

स्त्रीचित्रणातील मर्यादांचा शोध घेताना पुरुषी केंद्रावरून टेहळणी, बाह्यांगाकडे लक्ष, अंतर्मनाचा वेध घेण्याचा अभाव, स्त्री हे लैंगिक परिपूर्तीचे साधन मानणे, स्त्रीचे अंशदर्शन, एकारलेले कुतूहल या मर्यादांची चिकित्सा केली आहे. येथेही विस्ताराने स्पष्टीकरणांची आवश्यकता असल्याचे दिसते. 'पुरुषकेंद्री' आणि 'स्त्रीलैंगिकता' अशा गृहीतकांना स्त्रीवादी दर्शनाचा आधार आहे. 'पुरुषी व्यवस्थेतील गर्भित लेखक हा पुरुष असल्याने स्त्रीला जाणून घ्यायला काही मर्यादाही पडलेल्या आहेत. गर्भित लेखक स्वत:च्या विश्वामध्ये अधिक गुंतलेला असल्याने स्त्रीच्या अंतरंगात बुडी मारून तिच्या दु:खाचा तळ ढवळताना त्याला मर्यादा पडतात...' मर्यादांच्या संदर्भात असा निष्कर्ष नोंदवलेला आहे.

हा ग्रंथ पठाऱ्यांच्या साहित्यकृतींतील स्त्रीचित्रणांची चिकित्सा असून प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे गेल्या चाळीस-पंचेचाळीस वर्षांतील स्त्रीजीवनाची, स्त्रीचित्रणाची वाटचाल दर्शवणारा आहे. पठारे यांचा लेखनसंघर्ष या काळातील सांस्कृतिक स्थितीशीही सुरू आहे. स्त्रियांसाठीच्या चळवळींशी, विचारधारांशी लेखक म्हणून त्यांचा संवादी संबंधही आहे; तरीही स्त्रीचित्रणात मर्यादा आल्या आहेत, असे संसूचन येथे झाले आहे. साहित्याची चिकित्सा जीवनवादी आशयसूत्रांच्या आधारे करण्याचा हा एक चांगला प्रयत्न आहे. या ग्रंथातून पठाऱ्यांच्या साहित्यकृतींची पुन:पुन्हा वाचने होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. दर एक काळात साहित्यकृतींची पुन:पुन्हा विश्लेषणे होणे साहित्यसंस्कृतीची गतिमानता दर्शवितात. साहित्यकृतींच्या वाचनाच्या वैविध्यपूर्ण दृष्टिकोनांची निर्मिती होणे हे काव्यशास्त्राला गती देणे असते. गतिमानता निर्माण करणारा हा ग्रंथ स्वागतासाठी, चर्चेसाठी, नव्या वाचनदृष्टीसाठी प्रेरणा देणारा आहे.

◆

**प्रा. एकनाथ पगार**
चलभाष : ९४२१५०७५०९




## सुखदेव ढाणके यांना,

'पिंडपात' हा तुमचा कवितासंग्रह नुकताच वाचून संपविला. सत्त्व, सौंदर्य आणि गेयपूर्ण रचना यांचा सुरेख संगम या कवितेत झालेला आहे. आजकाल 'क्रियापद गाळलेले गद्यलेखन म्हणजे कविता' अशी एक सोपी अन् सवंग धारणा झालेली असताना तुमची कविता सर्वस्वी वेगळ्या स्वरूपाची आहे याची जाणीव झाली. तुमच्या या कवितेने एखाद्या वस्तूचे वा घटनेचे केलेले वर्णन म्हणजे कविता नव्हे, त्या घटनेचे घडविलेले चित्रमय दर्शन म्हणजे कविता नव्हे, सुंदर शब्दांची आखीव-रेखीव अशी सुंदर रांगोळी म्हणजे कविता नव्हे, याची चांगली जाणीव करून दिली आहे. कलात्मक सर्जन, काव्यात्म अनुभव, स्वाभाविक भाषा अन् सार्वकष आणि सखोल जीवनदर्शन म्हणजे चांगली कविता, ही धारणा अधोरेखित केली. विचाराच्या अधिष्ठानावर साकार झालेल्या भावना, संवेदनांचा आणि चिंतनाचा ललितरम्य आविष्कार म्हणजे कविता होय. याचा छानसा साक्षात्कार तुमच्या या कवितेतून घडतो. खरे तर कविता म्हणजे कवीच्या जळणाऱ्या रक्ताला येणारा मोहोर असतो. चांगला कवी स्वतःच्या रक्तात हात घालून जी तेजाची चिन्हे निर्माण करतो त्याला मी कविता मानतो. हा मोहोर आणि ही चिन्हे तुमच्या कवितेत ओसंडून वाहत आहेत यात शंका नाही. म्हणूनच शेक्सपियर याने 'जीवनाला लाभलेला पुनर्जन्म म्हणजे कविता' असे एक शाश्वत सत्य नोंदवून ठेवले आहे. ते 'पिंडपात'मध्ये अनुभवाला येत आहे.

तुमच्या अधिकांश कवितांचे आशयसूत्र आहे कृपिजीवन व कृपिसंस्कृती. शेती आणि शेतकरी आणि त्यांचे नानाविध कारणांनी पार उद्ध्वस्त झालेले जीवन हा या कवितांचा प्राणभूत घटक आहे. एका बाजूने त्याच्या समर्पित झालेल्या जीवनाची शोकांतिका व्यक्त झाली आहे, आणि दुसऱ्या बाजूने तुम्ही त्याची थोरवीही गायली आहे. माझे स्वतःचे असे प्रांजळ मत आहे, की ब्रह्माची निर्मिती करणारा आणि साऱ्या जगाच्या सनातन भुकेला शाश्वत उत्तर देणारा शेतकरी हा लोकनायक आहे, जननायक आहे आणि देशनायकही आहे. तो जगतो भूमीचा पुत्र, निसर्गाचा मित्र, संस्कृतीचा उपासक आणि सर्जनाचा दूत म्हणूनच. तरीही त्याला दैन्य, दारिद्र्य, दुःख, दुस्वास, शोषण, उपेक्षा, उपासमार, अज्ञान आणि अंधश्रद्धा या नवग्रहांनी आयुष्यभर छळलेले असते.

**कवी सुखदेव ढाणके यांचा 'पिंडपात' हा कवितासंग्रह काव्याग्रह प्रकाशनाच्या वतीने अलीकडेच प्रसिद्ध झाला आहे. या संग्रहाला ज्येष्ठ लेखक डॉ. द. ता. भोसले यांनी पत्राद्वारे दिलेली उत्स्फूर्त दाद.**

# एका लेखकाचे एका कवीस पत्र...











आयुष्यभर उघड्या पाठीवर ऊन झेलून जगाला चांदणे देणारा हा भूमिपुत्र कधी कुणाला आदरणीय वाटला नाही. त्याच्या श्रमांतून/घामातूनच राजाचे राजवाडे, सेनापतींचे गडकिल्ले, राण्यांचे शीशमहल, देवांची मंदिरे, पुरोहिताची साधना आणि योद्ध्याचा पराक्रम निर्माण होत असतो. म्हणून शब्दब्रह्म निर्माण करणाऱ्या लेखकाइतका, नादब्रह्म निर्माण करणाऱ्या गायकाइतका अन्नब्रह्म निर्माण करणारा हा भूमिपुत्र श्रेष्ठ मानला पाहिजे. तुम्ही तुमच्या कवितेत या सत्याला वेगवेगळ्या पद्धतीने आविष्कृत केले आहे. या संग्रहाचे हे खरे बलस्थान आहे.

या संग्रहातील तुमची कविता प्रतीक्षा आणि प्रार्थना या दोन गुणांनी श्रीमंत झालेली कविता आहे. तुमच्या या कवितेत काळ्याभोर मेघांची प्रतीक्षा आहे, पावसाची प्रतीक्षा आहे, भाजून निघालेल्या भूमीच्या नवनिर्मितीची प्रतीक्षा आहे; भरगच्च सुगीची, जनावरांच्या चारा-पाण्याची, भौतिक समृद्धीची आणि सुखी जीवनाची प्रतीक्षा आहे. फुला-फळांचा बहर यावा, पिकांचा बहर यावा, नदी-तळ्यांना पूर यावा यांचीही प्रतीक्षा या कवितेत आहे. म्हणजे एकापरीने शेती आणि



पिंडपात
सुखदेव ढाणके
काव्याग्रह प्रकाशन, वाशिम
पृष्ठे : ८८
मूल्य : १२० रु.

शेतकरी यांच्या स्वप्नपूर्तीची प्रतीक्षा या कवितेत जाणवते आणि यासाठी केलेली प्रार्थनाही काही कवींच्या गाभ्यातून झंकारताना आढळते. मला असे मनोमन वाटते, की मागणी वेगळी, केलेली विनवणी वेगळी आणि प्रार्थना वेगळी. मागणीमध्ये व्यवहार असतो, विनवणीमध्ये लाचारी असते, तर प्रार्थनेमध्ये साऱ्या जगाच्या कल्याणाची आस असते. मागणीमध्ये स्वार्थ असतो. प्रार्थना वैयक्तिक स्वार्थावर कधी उभी नसते. मागणी आत्मकेंद्रित असते. प्रार्थना 'स्व'चे वर्तुळ भेदून पलीकडे गेलेली असते. मागणीमध्ये गरज असते. प्रार्थनेत गरजेपेक्षा उन्नतीवर भर दिलेला असतो. तुमच्या या कवितेत प्रतीक्षा आणि प्रार्थना एकरूप होऊन चराचराच्या समृद्धीचे स्वप्न पाहत आहे; आणि या दोन्ही गोष्टींना पुन्हा अपेक्षाभंगाचा कडवटपणा जराही प्राप्त झालेला नाही हे विशेष.

तुमची जवळजवळ सारी कविता जातिवंत व अस्सल दुःखाच्या स्पर्शाने प्रकाशमान झालेली आहे. खरे तर कोणतेही दुःख सोबतीला अंधार घेऊन येते; पण ही दुःखाचा स्पर्श झालेली कविता आपल्या 'आतल्या' प्रकाशाला चेतविते. त्यामुळेच तुमच्या कवितेतील दुःख वाचकांना अनुभवांची श्रीमंती देते. ते जगण्यासाठी लागणारे शहाणपण शिकवते. ते माणसाला उन्नत करते, व्यापक आणि विशुद्ध बनवते आणि माणसाला माणसाशी जोडून घेते. म्हणून साऱ्या संग्रहावर दुःखाचा तरल शिडकावा झालेला असला तरी तुमची कविता आम्हाला आनंद देते आणि आमच्या जगण्याला ऊर्जाही पुरवते. कारण ते पायदळी तुडविल्या गेलेल्या चिरंतन मूल्यांचे दुःख आहे, शेतकऱ्याच्या विस्कटलेल्या जीवनाचे दुःख आहे, सर्जनाला उत्सुक असलेल्या वांझ भूमीचे दुःख आहे, दुष्काळ आणि अवर्षणाच्या आगीत भाजलेल्या चराचराचे दुःख आहे.

तुमच्या या साऱ्या कवितांचे एका शब्दात वर्णन करायचे झाले, तर मी 'फसवणूक' एवढा एकच शब्द वापरेन. कारण तुमच्या कवितेत पावसाने केलेली फसवणूक आहे, श्रमाच्या मोबदल्याने केलेली फसवणूक आहे, शासनाने केलेली फसवणूक आहे, नियतीने केलेली फसवणूक आहे आणि जगण्याने केलेली फसवणूक आहे. म्हणून तर तुमच्या तीन-चार कवितांत गळफास घेऊन मृत्यूला दिलेल्या आलिंगनाचे उल्लेख आलेले आढळतात. या फसवणुकीचे अनेक संदर्भ देता येण्यासारखे असले तरी विस्तारभयास्तव ते मी मुद्दामच टाळले आहेत.

तुमच्या या संग्रहात काही कवितांमधून अप्रत्यक्ष स्वरूपात तर काही कवितांतून प्रत्यक्षपणे लोकसंस्कृतीची श्रीमंती पाहावयास मिळते. या श्रीमंतीत श्रद्धा, सर्जन आणि संस्कार यांचा झालेला संगम मला पाहावयास मिळतो. श्रद्धेमध्ये प्रतीकाची उपासना महत्त्वाची असते, तर सर्जनात श्रमाची उपासना गृहीत धरलेली असते आणि संस्कारांत मूल्योपासना अनुस्यूत असते. श्रद्धेमध्ये आत्मिक स्थैर्य अभिप्रेत असते, तर सर्जनामध्ये स्वाभाविक विकास नि उंची गृहीत धरलेली असते आणि संस्कारांत सखोलता नि सातत्यावर भर द्यावा लागतो. श्रद्धा भक्तीच्या बेरजेतून जन्माला येते, तर सर्जन चैतन्याचा गुणाकार करते आणि संस्कार दुर्गुणांचा भागाकार करीत असतात. सर्जनातून अस्तित्व प्राप्त होते, तर संस्कार या अस्तित्वाला आकार देतात आणि श्रद्धा या आकाराला अधिष्ठान पुरविते. सर्जन लौकिक जीवनाकडे झुकलेले असते, तर श्रद्धा आणि संस्कार धार्मिक जीवनाला उचलून धरतात. अशा या वरवर पाहता परस्परभिन्न वाटणाऱ्या गोष्टींचा संगम या लोकसंस्कृतीत झालेला असतो. विठ्ठलावरच्या तुमच्या कविता समृद्धीतून तृप्त करणाऱ्या भूतकाळाच्या चित्रणातून, तुमच्या बालपणीच्या व मातृभूमीच्या संस्मरणातून अशा या लोकसंस्कृतीचे आपणाला दर्शन घडते. माणसांना एकत्र आणणारी, मनाला विश्रांती देणारी, काटेरी काळाच्या मगरमिठीतून मुक्त करणारी आणि पशुपक्ष्यांशी नाते जोडणारी ही संस्कृती तुमच्या कवितेला स्वतःची एक वेगळी ओळख करून देण्यास कारणीभूत ठरलेली आहे.

लोकजीवन, लोकमानस आणि लोकव्यवहार यांचे व्याकूळ करणारे दर्शन घडवताना तुमची कविता सर्व प्रकारच्या विषमतेवर नेमकेपणाने बोट ठेवते, हेही या कवितेचे वैशिष्ट्य आहे. एकीकडे आयुष्यभर उन्हात भाजून निघालेला शेतकरी उपाशी झोपतो, तर दुसरीकडे उन्हाचा स्पर्श न झालेला श्रीमंत तुपाशी जेवतो. एकीकडे गरिबाघरची माउली लेकरांसाठी स्वतःला शिजवते, तर दुसरीकडे श्रीमंताघरची पट्टराणी स्वतःला सजवते-मिरवते. एकीकडे डोळ्यांतल्या पापण्यांबरोबर घास गिळावा लागतो, तर दुसरीकडे लोण्याशिवाय मिष्टान्नाचा घास घशाखाली जात नाही. एकीकडे मातीत रावणारा स्वतःच्या आयुष्याची माती करून घेतो, तर दुसरीकडे मातीचा स्पर्श न झालेला संपत्तीत लोळत असतो. एकीकडे दुष्काळ आणि अवर्षण पाचवीला पुजलेले असते, तर दुसरीकडे पाच जन्म पुरतील एवढे सुखोपभोग पायाशी लोळत असतात. अशी ही पराकोटीची विषमता तुमच्या कवितेने पापणी ओली करून साकार केलेली आहे. उद्ध्वस्त झालेला मातीवरचा माणूस आणि त्याला दंश करणारी अभावग्रस्त परिस्थिती मोठ्या कळवळ्याने साकार केलेली आहे. त्यामुळेच तुमच्या या कवितेला कमालीची आवाहनक्षमता प्राप्त झालेली आहे.

भेगाळलेल्या ग्रामीण स्त्रीच्या जीवनाचे तुम्ही घडविलेले दर्शन कोणत्याही संवेदनशील वाचकाला अस्वस्थ केल्याशिवाय राहणार नाही. चुलीतल्या लाकडाबरोबर स्वतः जळणारी ही स्त्री साऱ्या चिरंतन मूल्यांचे प्रतीक म्हणून अवतरलेली आहे. यातली तुमची 'बाई' ही कविता तर स्त्रीजीवनाचे महन्मंगल स्तोत्रच वाटते. त्यातून तुमचा स्त्रीकडे पाहण्याचा निष्कलंक आणि सुसंस्कृत दृष्टिकोनही व्यक्त झाला आहे. इतरही काही कविता अशा आहेत. यातून व्यक्त झालेली स्त्रीप्रतिमा खरोखरच आदिमातेच्या, आदिशक्तीच्या प्रतिमेला स्पर्श करणारी झाली आहे. माझे असे प्रांजळ मत आहे, की स्त्री ही केवळ परंपरेची गुलाम नाही. भोगाची दासी नाही आणि घराची मोलकरीण नाही. स्त्री ही त्याग, सेवा, समर्पण, क्षमा आणि औदार्याचे प्रतीक आहे. ती वात्सल्याची सावली आहे, संस्कृतीची अधिष्ठात्री आहे, श्रमाची देवता आहे, सर्जनाची शक्ती आहे अन् मांगल्याची मूर्ती आहे. याच अर्थाने बायबलमध्ये एक वाक्य आहे. 'परमेश्वराला प्रत्येकाच्या घरात जाता येत नाही, म्हणून त्याने 'आई'ची निर्मिती केली' असे ते वाक्य आहे. जिच्या ओठावर वात्सल्याने चिंब झालेला शब्द नाचतो, जिच्या तळहातावर विश्वकल्याणाचे चित्र उमटते, जिच्या पावलांत शुभ स्वस्तिक चिन्ह उमटते आणि जिच्या नजरेत निरामय आणि निकोप समाजाचे स्वप्न तरळते ती स्त्री ईश्वराचे सगुण रूपच मानायला हवी. स्त्रीभ्रूणहत्या आणि स्त्रीबलात्कार करण्यात पुरुषार्थ मानणाऱ्या आजच्या अधःपतित समाजाच्या प्रत्येक घरात तुमची 'बाई' कविता सर्वांनी वाचायला हवी अशा ठिकाणी लावायला पाहिजे आहे.

**बाई...**

*स्वतःलाच पेरते / स्वतःतच उगवते*
*बीज होऊन बाई / रुजवते स्वतःला ॥१॥*

*पोटरीत येते / पक्व होते*
*कणीस होऊन कुशीत / बाई निसवते स्वतःला ॥२॥*

*निरखून पारखून / चोख निवडून पाखडून*
*ओवीसह बाई / दळते स्वतःला ॥३॥*

*चुलीवरचा तवा होते / तव्यावरची भाकर होते*
*इंगळावर परतून घेते / भुकेच्या ताटात बाई*

*वाढते स्वतःला ॥४॥*

*स्वतःच्या पोटाची भूक / नितकोरावर भागवते*
*भुकेला भुलवत बाई / रमवते स्वतःला ॥५॥*

*ती असते कणगीमध्ये / शिगोशीग भरलेली*
*पोटभर भरवूनही / दुरडीभर उरलेली ॥६॥*

*संसाराच्या कोऱ्या पाटीवर / बाई गिरवते स्वतःला*
*माय वाटेवर चालताना / बाई हरवते स्वतःला ॥७॥*

*ती असते आई / नाळनवतीची नवलाई*
*ती असते अंगाई / सायीने कोरलेली*
*ती असते संचित / जन्मोजन्मीची पुण्याई ॥८॥*

*तीच ऋचा, तीच सूक्ते / तीच अनादी प्रार्थना*
*तीच वेदना, आराधना / महाकाव्यांची प्रेरणा ॥९॥*

तुमच्या कवितेत लोकगीतांचा अंश उतरला आहे. जन्माला येणारी अनुभूतीच गेयतेचे रूप घेऊन अवतरत असावी. शिवाय, सामान्य वाचकांच्या रक्तात भिनलेली लोकगीताची रचना तुमच्या कवितेने स्वीकारली असल्याने शब्दमाधुर्य, नादमाधुर्य, गीतमाधुर्य व सत्त्वमाधुर्य यांचा तुमच्या कवितेत सुरेख संगम झालेला आहे.

सारांश, शेतकऱ्याच्या जीवनाचे भेदक दर्शन घडविणारी, माती आणि शेती यांची थोरवी गाणारी, पर्जन्याची प्रार्थना करणारी, उपेक्षित व सामान्य माणसाला कवितेत केंद्रस्थान देणारी आणि दारिद्र्याच्या पोटातली माणुसकी दाखविणारी ही कविता आहे. आशयाने सशक्त झालेली अन् आविष्काराने सौंदर्यसंपन्न बनलेली ही कविता वाचकांना अक्षय आनंद देता देताच अस्वस्थही करून सोडते. हेच या कवितेचे बलस्थान आहे.

तुमचा,
**डॉ. द. ता. भोसले**
चलभाष : ९४२२६४६८५५

◆






# वीणा आलासे
# बंगाली - मराठी भाषेचा सेतू

■■

**ज्येष्ठ अनुवादक वीणा आलासे यांच्या निधनाने मराठी आणि बंगाली साहित्याला जोडणारा एक महत्त्वाचा दुवा निखळला आहे. मराठी आणि बंगाली अशा दोन्ही भाषांतील साहित्यात त्यांनी मौलिक भर घातली. अनुवादाबरोबरच एक आस्वादक-समीक्षक म्हणूनही त्यांनी महत्त्वपूर्ण योगदान दिले. वीणा आलासे यांच्या आठवर्णीना उजाळा देणारा त्यांच्या एका स्नेह्याचा लेख.**

■■

वीणाताई प्रथम भेटल्या साधारणतः १५ वर्षांपूर्वी. नागपुरातील डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या घरी. आणि पुढील काळात हा स्नेह वाढतच गेला. डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या पत्नी शिवरंजनी कुलकर्णी या वीणाताईंच्या बालमैत्रीण. त्या दोघी एकाच वाड्यात वाढल्या. त्यामुळे वीणाताई म्हणत, ''माझी पहिली ओळख शिवरंजनीशी आणि नंतर द.भि.शी.'' खरं तर वीणाताईंचे माहेर-सासर नागपूरच असल्यामुळे त्यांचा मोठा मित्रपरिवार नागपुरात होता, आणि त्यामुळेच त्या नागपूरला येत, राहत. त्यांचं स्वतःचं घरही नागपूरमध्ये होतं. त्यामुळे इतकी वर्षं कोलकत्यात राहूनही त्यांनी नागपूरची नाळ तोडली नाही.

त्या अस्सल वऱ्हाडी होत्या आणि शेवटपर्यंत हे वऱ्हाडीपण त्यांनी जपलं. बोलण्या-चालण्यातला मोकळेपणा, स्पष्टोक्ती आणि अघळपघळपणा यामुळे त्यांच्यावरोबर गप्पांची मैफल खुलत असे. पान-सुपारीचा डबा हाताशी ठेवून त्या मस्त गप्पा रंगवत. त्यांचे वाचन समृद्ध होते. मराठीवर तर त्यांचे प्रभुत्व होतेच, पण तितकेच बंगालीवरही होते. विवाहानंतर पतीच्या नोकरीमुळे त्या कोलकत्याला गेल्या. त्यांनी तौलनिक साहित्याचा अभ्यास केला आणि शांतिनिकेतमध्ये त्या अध्यापन करू लागल्या. त्यांचे अध्ययनाचे काम तर शेवटपर्यंत चालूच होते.

त्यांच्या या वाङ्मयप्रेमामुळे नागपुरातील साहित्यवर्तुळाशी त्यांचे जवळचे संबंध होते. त्यांच्या समकालीन साहित्यिकांच्या साहित्यावर त्यांनी केवळ प्रेम किंवा चर्चा केली असे नाही, तर त्यावर समीक्षासुद्धा केली. डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या 'महाकाव्य : स्वरूप व समीक्षा' या ग्रंथाची समीक्षा तर त्या वेळी वाङ्मयीन प्रतिष्ठेच्या 'सत्यकथा' मासिकातून छापून आली. नंतरही त्यांनी अनेक समीक्षा लेख सत्यकथा व इतर मासिकांतून लिहिले. या सगळ्या लेखांचा संग्रह काढावा असा आग्रह मी त्यांना अनेक वेळा केला, परंतु त्यांनी माझा आग्रह फार गांभीर्याने घेतला नाही. दभिंप्रमाणेच कवी ग्रेस व इतर साहित्यिकांच्या साहित्यावरही त्यांनी समीक्षा केली आहे. कवी अनिलांच्या दशपतीबद्दल त्यांची समीक्षा व मत मात्र पटण्यासारखे नाही.

त्यांची ही समीक्षावृत्ती त्यांनी अनुवादित केलेल्या पुस्तकांना प्रारंभी लिहिलेल्या प्रस्तावनेतही स्पष्ट होते. एखादी मूळ कलाकृती आवडली म्हणून तिचा अनुवाद करणारे अनेक अनुवादक असतात; पण त्या कलाकृतीचे मर्म समजून सांगतानाच ते त्या कलाकृतीची सौंदर्यस्थळेही दाखवतात. त्यामुळेच अनुवाद वाचण्यापूर्वीच

वाचकाला वाङ्मयीन आकलनाचे भान त्या देतात. या प्रस्तावनाही दीर्घ आहेत. अनुवादाच्या पलीकडे जाऊन त्याची आस्वादक्षमता वाढविण्याचे कसब वीणाताईंकडे होते.

जे लोक बहुभाषिक आहेत आणि त्यांचे अनेक भाषांवर प्रभुत्व आहे असे फार थोडे लोक भारतात आहेत. वीणाताईंना मराठी, बंगाली, इंग्रजी, हिंदीबरोबरच काही प्रमाणात आसामी भाषेचीही चांगली जाण होती त्यांनी अनुवादाच्या संदर्भात जे मोठे काम केले त्यापैकी महत्त्वाचे म्हणजे महात्मा ज्योतिराव फुले यांच्या वाङ्मयाचा बंगालीत त्यांनी केलेला अनुवाद. पुढे या अनुवादास बंगाली भाषेसाठीचा साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. पद्मगंधा प्रकाशनाने त्यांच्या 'तीन आत्मकथा' (तीन वंग स्त्रियांची आत्मकथने) हे पुस्तक प्रकाशित केले व त्यास मराठी अनुवादासाठीचा साहित्य अकादमीचा २०१० सालचा पुरस्कारही जाहीर झाला. वीणाताईंवर अभिनंदनाचा वर्षाव झाला. एकाच अनुवादकाला दोन्ही भाषांतील अनुवादासाठी पुरस्कार मिळणे ही खरे तर कौतुकास्पद गोष्ट; परंतु हा आनंद वीणाताईंना फार दिवस मिळाला नाही. तीन-चार महिन्यांनंतर अकादमीचे पत्र आले : 'नजरचुकीने आपणास हा पुरस्कार मिळाल्याचे कळवले गेले. आम्ही हा पुरस्कार आता तुम्हाला देऊ शकत नाही.' अकादमीचे म्हणणे होते, की तुम्हाला एकदा बंगाली भाषेसाठी पुरस्कार मिळाला आहे. अकादमीचे हे म्हणणे पटण्यासारखे नाही, कारण हा पुरस्कार वीणाताईंना मराठीसाठी मिळाला होता. अकादमीचे प्रमुख मूर्ती फोनवरूनच वीणाताईंना म्हणाले, "Its human error only". या प्रकरणात वीणाताईंना जो मानसिक क्लेश झाला असेल त्याची दखल कोण घेणार?



असो. वीणाताईंनी पुरस्कारासाठी थोडेच काम केले होते? त्यांच्या वाङ्मयनिष्ठेबद्दल शंकाच नाही. त्यांनी जे अनुवाद केले ते निखळ वाङ्मयप्रेमातून.

वीणाताई शांतिनिकेतनमधून निवृत्त झाल्यानंतर अनेकांना वाटले, त्या आता नागपूरला राहायला परत येतील; पण असे झाले नाही. त्यांची मुलगी वंदना कोलकत्याला राहते. वंदनाची मुलगी शांतिनिकेतनमध्ये शिक्षणासाठी गेली, तेव्हा तिच्यासाठी म्हणून वीणाताई पुन्हा काही दिवस शांतिनिकेतनमध्ये राहिल्या. कोलकत्यात त्यांचे स्वतःचे घर होते आणि मुलीकडे सहज जाता यावे यासाठी त्यांनी कोलकत्यात राहणे पसंत केले. मुलगा चेन्नईत होता. पण त्या म्हणायच्या, "मी रमते एक तर नागपुरात नाही तर कोलकत्यात." कारण त्यांचे वाचन, लेखन आणि वाङ्मयीन स्नेही या दोन शहरांतच होते.

वीणाताईंनी बंगाली वाङ्मयाचा सखोल अभ्यास केला होता. त्यामुळेच स्त्रीलिखित भारतीय साहित्याच्या महाप्रकल्पात त्यांनी बंगाली साहित्यावर दीर्घ लेख लिहिला आहे.

कविवर्य कुसुमाग्रज डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांच्याविषयी बोलताना म्हणाले होते, की डॉ. बांदिवडेकर हे आमचे मराठी भाषेचे दिल्लीतील राजदूत आहेत. प्रा. वीणा आलासे याही मराठी भाषेच्या कोलकत्यातील राजदूत होत्या, असेच म्हणावे लागेल. २९ मे २०१५ ला त्यांचे कोलकत्यात निधन झाले आणि मराठी बंगालीचा सेतूच तुटला. श्री. बा. जोशी यांच्याप्रमाणे बंगाली भाषेतील सर्वच- म्हणजे महाश्वेतादेवींपासून ते कालपरवापर्यंतच्या नवख्या लेखकांबरोबर त्यांचे संबंध होते. कोलकत्याच्या बंगाली साहित्य-संस्कृतीत त्या एकरूप झाल्या होत्या.

प्रत्येकाच्या आयुष्यात काही सगळेच दिवस चांगले असतात असे नाही. वीणाताईंनाही आयुष्यात अशा अनेक गोष्टींना सामोरे जावे लागले. पतिनिधनानंतर त्या पुन्हा खंबीरपणे उभ्या राहिल्या. पुस्तकांत रमल्या, मित्रपरिवारात रमल्या. त्यांचा हा स्नेह व मोकळे चालणे-बोलणे व ती गप्पांची मैफल आता नाही. नागपुरात गेल्यावर आवर्जून ज्यांच्याकडे जावे अशा काही घरांपैकी वीणाताईंचे घर होते.

'कथा पंचदशी' हा महाश्वेतादेवींच्या कथांचा अनुवाद, 'तीन आत्मकथा' हा अनुवाद हे त्यांचे मराठीतील महत्त्वपूर्ण अनुवाद मी प्रकाशित केले आहेत. तरीही प्रकाशक-लेखिका या संबंधापलीकडे आमची मैत्री होती. अनेक वेळा त्यांनी कोलकत्याला बोलावले, पण जायचे राहून गेले, ही रुखरुख मात्र आज आहे.

◆

**अरुण जाखडे**
चलभाष : ९८५००८६४२३

# परंपरा आणि नवता यांची सांगड घालणारं राजहंस प्रकाशन







पुण्याच्या सदाशिव पेठेतील नागनाथ पाराजवळील राजहंस प्रकाशनचं छोटंसं पण आकर्षक कार्यालय. दरवाज्यातूनच नजरेत भरणारा आणि सुखावणारा निळा रंग. संपादक मंडळासाठी, कर्मचाऱ्यांसाठी बसण्याची खास व्यवस्था. पुस्तकांची आकर्षक माडणी... सारंच राजस म्हणण्यासारखं. या राजहंस प्रकाशनाला प्रकाशन क्षेत्रात नाव मिळवून देणाऱ्या दिलीप माजगावकरांची केबिनही मन प्रसन्न करणारी. एका बाजूला पारितोषिकं मांडलेली तर मागच्या बाजूला चार्ली चॅप्लिनचं आकर्षक छायाचित्र. ''प्रकाशनाच्या व्यवसायात येऊन येत्या जूनमध्ये मला पन्नास वर्षं होतील.'' दिलीप माजगावकरांनी नेहमीच्या खेळकर पण थोड्याशा गंभीर पद्धतीने सांगायला सुरुवात केली, ''मी जून १९६६ मध्ये राजहंस प्रकाशनात प्रवेश केला, पण 'राजहंस'ची सुरुवात आधीपासून झाली होती.''



**'माणूस' साप्ताहिक आणि राजहंस प्रकाशन यांच्या सुरुवातीपासूनच्या प्रवासाविषयी काय सांगाल?**

- १९५२ मध्ये बाबासाहेब पुरंदरे यांनी त्यांच्या स्वतःच्या पुस्तकांचं प्रकाशन करण्यासाठी ही प्रकाशन संस्था सुरू केली. 'राजहंस' हे नावही बाबासाहेबांनीच दिलं आहे. 'जळत्या ठिणग्या', 'दख्खनची दौलत', 'पुरंदरच्या बुरुजावरून', 'राजगड', 'रायगड', 'सिंहगड', 'सावित्री' इ. बाबासाहेबांची पुस्तकं १९५२-१९५७ या काळात राजहंस प्रकाशनाने प्रसिद्ध केली. १९५७ मध्ये श्री. ग. माजगावकर (माझे मोठे बंधू) बाबासाहेबांना जाऊन मिळाले. दोघांनी संस्था वाढविण्यासाठी, संस्थेला ओळख मिळवून देण्यासाठी खूप चांगले प्रयत्न केले. त्या वेळेस मुख्य प्रकाशन बाबासाहेबांच्या 'राजा छत्रपती'चं होतं. १९६१ मध्ये श्री. ग. माजगावकरांनी 'माणूस' सुरू केलं. अडीच





अनुक्रमणिका



# प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प

सुजाता शेणई












**वाचक आणि प्रकाशक यांचं नातं अतूट असतं. वाचनसंस्कृती वाढवण्याची आणि ग्रंथप्रसाराची मोठी जबाबदारी साहित्य व्यवहारातल्या या दोन महत्त्वाच्या घटकांवर अवलंबून असते. अनेक प्रकाशक चांगल्या व गांभीर्याने वाचन करणाऱ्या वाचकांसाठी अनेक प्रकल्प हाती घेऊन साहित्याचं दालन समृद्ध करत असतात.**

**अशाच काही मराठी प्रकाशन संस्थांचा आणि त्यांच्या विविध प्रकल्पांचा परिचय 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरातून देत आहोत.**

**या अंकात 'राजहंस' या प्रकाशनसंस्थेच्या प्रवासाविषयी, भूमिकेविषयी तसेच त्यांच्या विविध प्रकल्पांविषयी 'राजहंस'चे दिलीप माजगावकर यांच्याशी साधलेला संवाद.**

वर्षं ते पाक्षिक होतं आणि जून १९६६ पासून साप्ताहिक झालं. 'माणूस'ने कोणत्याही राजकीय वा सामाजिक विचारसरणीला बांधून न घेता सर्व विचारांचं आदानप्रदान व्हावं आणि मुक्त विचारपीठ म्हणून वाचकांमध्ये ओळख निर्माण व्हावी अशी भूमिका सुरुवातीपासूनच स्वीकारली होती. त्या काळात 'माणूस'मधून 'नाझी भस्मासुराचा उदयास्त', 'व्होल्गा जेव्हा लाल होते', 'आणि ड्रॅगन जागा झाला', 'फिडेल, चे आणि क्रांती' अशा लेखमाला येत होत्या. या लेखमाला विलक्षण गाजल्या. 'सांगत्ये ऐका', 'टॉलस्टॉय : एक माणूस', 'एक होता कार्व्हर' या पुस्तकांच्याही लेखमाला आधी 'माणूस'मधून प्रसिद्ध झाल्या. या लेखमालांना मिळणारा चांगला प्रतिसाद पाहता पुस्तकनिर्मिती अधिक सजगतेने व्हायला हवी असं वाटायला लागलं आणि १९८२-८३मध्ये 'राजहंस'कडे अधिक लक्ष द्यायचं आम्ही ठरवलं. १९८२ मध्ये 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' या पुस्तकाची डीलक्स आवृत्ती प्रकाशित झाली. पुढे चरित्र, आत्मचरित्र, इतिहास, राजकारण, समाजकारण या विषयांबरोबरच कथा, कादंबऱ्या, विज्ञान, पर्यावरण, अंधश्रद्धा निर्मूलन अशा विषयांचीही जोड देऊन पुस्तके प्रकाशित केली. एकूणच, विषयांची व्याप्ती वाढवून प्रकाशनावर लक्ष अधिक केंद्रित केलं.

**राजहंस प्रकाशनाचा जम बसू लागल्यावर कोणता प्रकल्प केलात? हा प्रकल्प वाचकांपर्यंत पोहोचवण्यासाठी कोणते प्रयत्न केलेत?**

- प्रकल्प करणं हे मोठं काम असतं. मनासारखा विषय शोधून त्या विषयावर दर्जेदार काम करणारा लेखक शोधणं हा प्रकाशकाच्या आनंदाचा भाग असतो. प्रकल्प करायचा तर अर्थकारण जमायला हवं, कारण प्रकल्पाचा खर्च मोठा असतो. आमचा पहिला मोठा प्रकल्प 'सृष्टिविज्ञानगाथा (भाग १ ते १०)' हा होता. याचे संपादकीय सल्लागार डॉ. जयंत नारळीकर होते. संपादक डॉ. हेमचंद्र प्रधान, तर लेखक डॉ. श्रीराम गीत होते. हा प्रकल्प करताना वर्षभर जी पुस्तकं प्रकाशित होऊन खपत होती त्याच्यातून उभ्या राहणाऱ्या भांडवलावर प्रकल्पाचं अर्थकारण बसवायचं होतं. प्रकल्प

लोकांपर्यंत पोहोचवायचा असेल तर जाहिरात करायला हवी आणि जाहिरात म्हणजे खर्च आला; पण तरीही आम्ही हे केलं. त्याचबरोबर भारताच्या स्वातंत्र्याला पन्नास वर्षं पूर्ण झाली तेव्हा भारताचा स्वातंत्र्यलढा समग्रपणे मांडता यावा म्हणून 'सत्तावन्न ते सत्तेचाळीस, भाग १ व २' हा वि. स. वाळिंबेलिखित प्रकल्प आम्ही केला. हा प्रकल्प वाचकांपर्यंत नेण्यासाठी शाळाशाळांत व्याख्यानमाला आयोजित केल्या. घरोघरी प्रतिनिधी पाठवून पत्रकं वाटून, नोंदणी करून घेतली. टेलिफोन कॅम्पस राबवला. यासाठी प्रतिनिधींना खास प्रशिक्षण दिलं. चांगला प्रकल्प लोकांपर्यंत पोहोचवण्यासाठी व्यावसायिक दृष्टिकोन समोर ठेवून जे जे करणं शक्य होतं ते काटेकोरपणे केलं. हे करताना एक सूत्र आम्ही कायम मनाशी बाळगलं आहे, जसं जीवनावश्यक औषध खपवण्यासाठी डॉक्टर प्रयत्न करतात, तसं जीवनावश्यक नसणारं पुस्तक खपवण्यासाठी प्रकाशकाला अधिक मेहनत ही करावीच लागणार. प्रकाशकाचा उत्साह प्रकल्पाच्या निर्मितीत खूप असतो, कारण त्यातून आनंद मिळतो, बौद्धिक भूक भागते. एकदा निर्मिती संपली की त्याचा उत्साह संपतो. विपणन, मार्केटिंगला तो कंटाळतो. मग तो पुढच्या पुस्तकाकडे वळतो.

'सृष्टिविज्ञानगाथा' आणि डॉ. जयंत नारळीकर यांच्या 'आकाशाशी जडले नाते' या दोन प्रकल्पांनी आम्हाला शब्दशः तुडुंब यश दिलं. त्यानंतर 'अमृतसिद्धी', 'चंद्रलोक', 'सुटेबल बॉय', 'महानायक', 'झाडाझडती', 'बायबल', 'लोकमान्य ते महात्मा', 'बोक्या सातवंडे' असे अनेक प्रकल्प केले. पु. ल. देशपांडे यांच्या साहित्याचा मागोवा घेणारा समीक्षात्मक ग्रंथ 'अमृतसिद्धी' चांगला होऊनही त्याला म्हणावा तसा प्रतिसाद मिळाला नाही. कदाचित त्यामागचं एक कारण असं असावं, की वाचकांना पु.लं.च्या साहित्यात रस आहे, समीक्षेत नाही.

**मराठी प्रकाशनविश्वात दुर्मिळ असलेली व्यावसायिकता राजहंसने कसोशीने जपली आहे. काय सांगाल याबद्दल?**

- विश्वास पाटील यांच्या 'पानिपत' कादंबरीने राजहंसला व्यावसायिक प्रकाशकांच्या प्रवाहात आणून सोडलं. पुपुल जयकरलिखित आणि अशोक जैन अनुवादित 'इंदिरा' या पुस्तकाने मोठा ब्रेक मिळवून दिला. त्यानंतर मी प्रकाशनातील व्यावसायिकता जपण्यासाठी 'विषय, लेखक, निर्मिती, मूल्य आणि वितरण' या पाच घटकांवर जाणीवपूर्वक विशेष लक्ष केंद्रित केलं. विषयांची व्याप्ती खूप वाढवली. स्पर्धेत टिकायचं तर विषयांत विविधताही हवी आणि दर्जेदार निर्मितीही साधता आली पाहिजे. म्हणून मग या क्षेत्रातल्या जाणकारांचं संपादक मंडळ नेमलं. संपादकाने लेखकाला खुलवणं, संपादनसाहाय्य करणं अपेक्षित असतं. लेखनाच्या ओघात लेखकाकडून काही सुटलं असेल तर ते त्याच्या नजरेस आणून देणं हे संपादकाने केलं पाहिजे. हे करताना पुस्तक लेखकाचं आहे हे भानही सुटता कामा नये. लेखक आणि संपादक यांनी हातात हात घालून काम केलं तर उत्तम निर्मिती होते. पण संपादकाने त्याची आग्रही भूमिका लेखकावर लादता कामा नये. हे सगळं टीमवर्क असतं. या टीमवर्कमधूनच 'मेळघाटावरील मोहर', 'झिम्मा', 'खेळता खेळता आयुष्य' या पुस्तकांची निर्मिती झाली आणि त्याला प्रतिसादही चांगलाच मिळाला.

**वाचनसंस्कृती जोपासणं आणि वाढवणं यासाठी काय करत आहात?**

- चांगल्या ग्रंथालयांपर्यंत पुस्तकं कशी पोचतील याकडे




**विश्वास पाटील यांच्या 'पानिपत' कादंबरीने राजहंसला व्यावसायिक प्रकाशकांच्या प्रवाहात आणून सोडलं. पुपुल जयकरलिखित आणि अशोक जैन अनुवादित 'इंदिरा' या पुस्तकाने मोठा ब्रेक मिळवून दिला. त्यानंतर मी प्रकाशनातील व्यावसायिकता जपण्यासाठी 'विषय, लेखक, निर्मिती, मूल्य आणि वितरण' या पाच घटकांवर विशेष लक्ष केंद्रित केलं. विषयांची व्याप्ती खूप वाढवली.**

दिलीप माजगावकर
राजहंस प्रकाशन
चलभाष : ९८२२१९०६२३
rajhansprakashan1@gmail.com

लक्ष देणं आवश्यक आहे. वाचकांच्या पुस्तकखरेदीला मर्यादा पडतात हे मान्य करायलाच हवं. आम्ही आमच्या पुस्तकांत शेवटी 'फीडबॅक फॉर्म' टाकतो, जेणेकरून वाचकांना काय हवंय हे तरी कळावं. आजची तरुण पिढी ही तंत्रज्ञानाशी जोडलेली पिढी आहे. ते पुस्तकं संगणकावर वाचणं पसंत करतात. ही त्यांची गरज आणि आवड लक्षात घेऊन राजहंस, मौज, रोहन, जोत्स्ना, कॉंटिनेंटल आणि केशव भिकाजी ढवळे अशा आम्ही सहा प्रकाशनसंस्था एकत्र येऊन 'मराठी रीडर डॉट कॉम' ही वेबसाइट सुरू करत आहोत. पुढच्या वर्षअखेरपर्यंत याचं काम पूर्ण होईल. त्यातून आम्ही तंत्रज्ञान व तरुण पिढी यांच्याशी जोडले जाऊ, असा विश्वास वाटतो.

**मराठी प्रकाशन व्यवसायासमोर आज कोणती महत्त्वाची आव्हानं आहेत? त्याला कसं सामोरं जायला हवं?**

- मोठं आव्हान म्हणजे दर पाच वर्षांनी बदलल्या जाणाऱ्या पिढीची मानसिकता ओळखणं हे आहे. ही पिढी नेमका कोणता विचार करतेय, तिला काय हवंय हे समजून घेतलं पाहिजे; नाही तर अजूनही आम्ही अर्वाचीन आणि साठोत्तरी वाङ्मयविषयांतच रमून घेतोय, हे फार काळ चालणार नाही. आज अशी सक्षम मासिकं नाहीत ज्यातून चांगले विषय आणि लेखक अजमावता येतील. मग नवे, चांगले लेखक आणि विषय कोठून शोधणार? नवीन विषयांना कनेक्ट करून घेणारे संपादक नाहीत; संपादक असतील तर ते स्वतःचा पराभव मान्य करायला तयार नाहीत. नवीन पिढीला आम्ही कनेक्ट व्हायला कमी पडत आहोत. त्यांच्या विचारांचा, विषयांचा वेध कसा घ्यायचा यामध्ये मागे पडत आहोत. तेव्हा वाचक वर्गाच्या नावाने ओरडण्यात अर्थ नाही. प्रकाशकांनी आता कोणत्याही एका भाषेचा विचार करून चालणार नाही. किमान दोन म्हणजे प्रादेशिक आणि इंग्रजी भाषा स्वीकारणं आवश्यक आहे. आम्ही या क्षेत्रातलं रीतसर शिक्षण घेतलं नाही, पण ज्याला कुणाला या क्षेत्रात यायचं असेल त्याने जर रीतसर शिक्षण घेतलं तर उत्तम प्रकाशन व्यवसाय करता येईल. या व्यवसायाला कधीही 'पडता काळ' नव्हता आणि येणारही नाही.

१९९० नंतर प्रकाशनसंस्था व्यक्तिकेंद्रित राहिली नाही. आधी प्रकाशक आणि प्रकाशनसंस्था यांचं वाचकांच्या मनात घट्ट नातं होतं. आता हे चित्र बदलतंय. संस्था टिकली पाहिजे आणि टिकवली पाहिजे हे मोठं आव्हान आहे.

**आपला मित्रपरिवार मोठा आहे, तेव्हा मैत्री आणि व्यवसाय कसा जपता?**

- खरं तर मी गर्दीतला माणूस नाही. थोड्या लोकांत रमणारा आहे. पण तरीही शांता शेळके, के. रं. शिरवाडकर, सु. रा. चुनेकर, रवींद्र देसाई, अंबरीश मिश्र अशी किती तरी नावं घेता येतील अशांशी माझे चांगले मैत्रीचे संबंध होते, आहेत. यांच्यामुळे माझ्यात वाचन आणि विचार करण्याची पद्धत आली, विविध विषयांचे स्रोत मिळत गेले. वाचन, विषय आणि विचार हे चांगल्या पद्धतीने कसे वापरायचे हे मी यांच्याकडून शिकलो. श्री. पु. भागवत, मंगेश पाडगावकर, विजय तेंडुलकर, वसंत सरवटे यांचा तर माझ्यावर प्रभाव आहेच. रामदास भटकळ यांच्याशी माझी व्यक्तिगत मैत्री आहे. त्यांनी त्यांच्या वडिलांचं लिहिलेलं व्यक्तिचित्र मला आवडलं होतं. अशी चांगली व्यक्तिचित्रं लिहिलीत तर मी पुस्तक काढेन, असं रामदास भटकळांना मी म्हणालो होतो. त्याप्रमाणे त्यांची 'जिगसॉ' आणि 'जिव्हाळा' ही पुस्तकं काढली.

**आता नवीन काय सुरू आहे?**

- सध्या मनात 'विसाव्या शतकातील शंभर उत्कृष्ट कादंबऱ्यांची कथानकं' एकत्र आणण्याचा विचार चालू आहे. वि. ग. कानिटकरांनी यावर थोडं काम केलं आहे. हा एक प्रकल्पवजा कोश[illegible]. होई[illegible] काही लेखकांना मदतीला घेऊन हे काम करता येईल. याचा फायदा असा होईल, की वाचकाला एखादी कादंबरी आवडली तर तो मूळ कादंबरीपर्यंत जाईल. यातून विसाव्या शतकाचा पट काही प्रमाणात तरी वाचकांच्या नजरेसमोर येईल, असा विश्वास वाटतो. तरुण पिढीला आपण नेमकं काय वाचावं यासाठी याचा उपयोग होईल आणि एका वाङ्मयप्रकाराचं संकलन यातून होईल अशी आशा आहे.

दिलीप माजगावकरांशी मुलाखतवजा गप्पा तर छान झाल्या. यातून जाणवत होती ती त्यांची परंपरा आणि नवता यात सांगड घालण्याची धडपड आणि नव्या पिढीची मानसिकता समजून घेण्याची तळमळ.

◆

सुजाता शेणई
चलभाष : ९०१०१७९१६

अनुक्रमणिका



**विशेष लेख**

**प्राची देशपांडे**

■■

**समकालीन महत्त्वाचे कथाकार प्रशान्त बागड यांच्या 'विवादे विषादे प्रमोद प्रवासे' या 'शब्द पब्लिकेशन'ने प्रकाशित केलेल्या कथासंग्रहावर भाष्य करणारा लेख.**

# कथेच्या 'कथापणा'चा शोध घेणाऱ्या कथ

प्रशान्त बागड यांच्या 'विवादे विषादे प्रमादे प्रवासे' कथासंग्रहात एकूण अकरा कथा आहेत. यातून अनेक रोचक पात्रं भेटतात- सेक्रेटरी हिनाच्या प्रेमात पडणारे मोहनराव, नवरा शोधणारी इंद्राणी, लायब्ररीत कडक सुधारणा आणणारा अभ्यासक प्र, सुटीत मित्रांशी खेळणारा संतोष, इत्यादी. कथा लिहू आणि सांगू पाहणारे लेखकही अनेक कथांमधे भेटतात. पण या संग्रहातील सर्व कथांना एकत्र जोडणारे मुख्य पात्र आहे खुद्द कथा हा रचनाप्रकार. एरवी वाचकासमोर कथा येते ती संपूर्ण रचून, घासून गुळगुळीत केलेल्या रूपात. रचनेची दीर्घ प्रक्रिया तीत अंतर्भूत असली तरी प्रक्रिया कथेतच स्पष्ट केली जात नाही. याउलट, बागडांच्या बहुतेक कथा 'मेटाफिक्शन' म्हणता येतील. मेटाफिक्शनमधे कथेतच तिची घडण उलगडून दाखवणे, तिच्या रचनेत पदोपदी घेतलेले निर्णय आणि पर्यायी शक्यता, त्यांचा पात्रांवर आणि कथानकावर परिणाम आणि त्यातून निघणाऱ्या अर्थांचे उत्खनन केले जाते. वास्तववादी, सुसंगत कथानकातील वस्तुस्थिती दर्शवण्याच्या दाव्याला मेटाफिक्शन छेद देते, तिचे 'रचलेपण' उघड करते, असा या कथासंग्रहाचा 'मेटाफिक्शनल' आशय आहे. प्रथम सुरळीत चालू झालेल्या गोष्टीत निवेदक मधेच डोकावून वाचकाशी कथानकातून बाहेर पडून बोलू लागतो. सुव्यवस्थित घटनाक्रमाला विस्कटून वाचकाला बुचकळ्यात पाडतो. कधी हे हलक्या विरोधाभासाने साधले जाते. 'एक स्पष्ट गोष्ट'मधील मोहनराव उत्स्फूर्त भावनेऐवजी वेळ ठरवून प्रेमात पडतात, तर 'छंदोभंग'मधली इंद्राणी पारंपरिक पद्धतीने स्थळ शोधते, पण एक नाही तर दोन नवऱ्यांच्या शोधात असते. एरवी परिचित वाटणारे वातावरण आणि पात्रे अनपेक्षित, पण सुरळीत कथानकात अत्यंत नॉर्मलपणे वावरतात. तर 'भाषिक आणि साहित्यिक विश्लेषण'सारख्या कथेमधे दोन डॉक्टरांची गोष्ट सांगताना कथेचा निवेदक पुनःपुन्हा कथेला निराळेच वळण देऊन अपेक्षित क्रमाचा भंग करतो, एकाच कथेच्या प्रत्येक वाक्यात निवडलेल्या विशेषणांची चर्चा करतो, त्याने नेमके काय साधले हे सांगतो, आणि इतक्या निराळ्या शक्यतांकडे निर्देश करतो, की वाचकाला त्याला 'आता गप रे बाबा, मला गोष्ट तरी ऐकू दे!' असे वैतागून सांगावेसे वाटते.

हीच अस्वस्थता बागडांना मुद्दामहून अपेक्षित असावी. कारण आपण रचलेली कथा वाचत आहोत याकडे सतत वाचकाचे लक्ष वेधून



**विवादे विषादे प्रमादे प्रवासे**
प्रशान्त बागड । शब्द पब्लिकेशन
पृष्ठे : १२८ । मूल्य : १३५ रुपये

संपूर्ण आणि सुसंगत कथानकाची मूळ कृत्रिमताच त्यांना अधोरेखित करायची आहे. 'मायथळ/फेलो' कथेच्या सुरुवातीला संपादक दिवंगत लेखकाच्या विस्कळीत नोंदींमधून सुसंगत कथानक तयार करण्याच्या अडचणीचा उल्लेख करतो. तसेच, 'सोपान'मधे लेखकाची मानसिक दुविधा, आणि सल्ला देणाऱ्या सरांच्या टिपणांमधून तो लिहू इच्छिणारी (आणि वाचकाला अपेक्षित असलेली) सुसंगत अशी कथा मधेच डोकावत राहते. पण पुढे या दोन्ही कथांमधे कथाकारांचे मनोगत आणि त्यांनी कल्पिलेल्या गोष्टींचे खर्डे एकत्र गुंफले जातात. मग मूळ कथा कोणती व तिची सुरुवात व शेवट नेमका कुठे हे वाचकाला सहज ठरवता येत नाही. एकूण, लेखक-निवेदक-वाचक या त्रयीमधील पारंपरिक धाग्यांचा, नात्याचा या सर्व कथांमधे गुंता होऊन बसतो. एकीकडे 'आपण' या संबोधनाद्वारे निवेदक वाचकाला लेखकाला गाभ्यात एक आरंभबिंदू, उगम अभिप्रेत असतो. असा आरंभबिंदू शक्य तरी आहे का? कोणत्याही घटना किंवा पात्राला पूर्वेतिहास हा असणारच, हा प्रश्न मग उद्भवतो आणि चर्चा चालू राहते.

कथा रचणे, लिहिणे ही प्रक्रिया नेमकी काय व कशी असते, उत्स्फूर्त लेखन शक्य आहे का आणि त्यात लेखकाच्या सृजनशीलतेचा वाटा काय असावा, हे विचार बागडांच्या लेखनाचा तात्त्विक गाभा आहेत. सर्व कथा आपापल्या परीने याच प्रश्नांना भिडताना दिसतात. 'सोपान'सारख्याच, 'दौत, शाई, टाक' या संग्रहातील श्रेष्ठ कथेत 'नैसर्गिक' आणि 'कल्पित' या द्वंद्वाच्या स्वरूपात हा प्रश्न कथेतील कथाकाराला भेडसावतो. घटना किंवा पात्रांपेक्षा एखाद्या लेखकाची विचारप्रक्रिया आणि अभिव्यक्तीची, काळ्यावर पांढरं करण्याची इच्छा हीच या

# 'विवादे विषादे प्रमादे प्रवासे'

लेखकाच्या विचारप्रक्रियेतच सहभागी करतोय, कथेच्या अस्सल अर्थाच्या अधिक जवळ आणतोय असा आभास होतो, पण दुसरीकडे असे संभाषणदेखील कथानकाचाच ठरवून रचलेला, कल्पिलेला भाग आहे हे स्पष्ट होते. या अंतर्विरोधातून बागड अनेक प्रश्न उपस्थित करतात : कथानकातून लेखकाशी किंवा वाचकाशी संवाद साधणे म्हणजे नेमके काय? अशा संवादांमार्गे वाचकाला कोणत्याही लेखकाशी- अगदी ज्ञानेश्वरांसारख्या प्राचीन लेखकाशीदेखील- संवाद साधता येईल का? त्यांनी लिहिलेल्या कथांबरोबरच न लिहिलेल्या कथांचीही चाहूल घेता येईल का? प्रत्येक संहितेत लेखक, निवेदक व वाचक/श्रोत्यासाठी अनंत गुपिते आणि शक्यता दडलेल्या असतात, ही कल्पना उलगडत जाते. 'सोपान' कथेतील लेखक आपल्याच लेखनाला प्रेमाने कुरवाळतो. संपादकांना हवी असते सुटसुटीत, अथपासून इतिपर्यंत कथा; पण त्याला मात्र एकेक वाक्य आणि शब्दाचा आस्वाद घेत बसावेसे वाटते. अमृतकर सरांबरोबर कथेच्या गाभ्यावरून तो वाद घालतो. कथेचा गाभा हा वाचक आणि लेखकामधील संघर्षातून, मतभेदातून उद्भवतो, असे ते म्हणतात. पण कथेचा केंद्रबिंदू आहे (म्हणून हे शीर्षक). कथेची सुरुवात साधी, नेहमीसारखीच करावी म्हटलं, तर ती पद्धत आता जुनी झाली; नवीन काही तरी केलं पाहिजे असं त्याला वाटतं. पण कथेचा प्रारंभ होता होत नाही, तेव्हा त्याला वाटतं, की अशा वेगळेपणाचा हट्ट तरी कशाला? फक्त वेगळेपणाने काय साधले आहे? असंख्य निराळ्या सरी येऊन गेल्या तरी पाऊस तोच नाही का? इतके कष्ट घेऊन कल्पिलेली, रचलेली गोष्ट इतकी स्वाभाविक कशी वाटू शकते याने तो चकित होतो. कथेत स्वाभाविकपणाला इतके महत्त्व तरी कशाला? आपल्या कथेचा खरा अर्थ ठरवणारा मी स्वत: कथाकारच असतो असे त्याला वाटते, तेवढ्यात अचानक त्याच्याकडून एक वाक्य आपसूक रचले जाते आणि तो पुन्हा आश्चर्यचकित होतो. कथाच त्याला हवे ते सांगून टाकते की काय असा त्याला भास होतो. रचना जर अशी आपसूक, नैसर्गिक वाटणारी असू शकते, तर निसर्ग ही संकल्पनाच वस्तुनिष्ठ सत्य नसून, सृजनात्मक रचना आहे का, हा प्रश्न त्याला सतावतो. मित्राशी वाद घालताना कथाकार निसर्गाचा खरा अर्थ, म्हणजे त्याच्या अमाप, अनाकलनीय भव्यतेचा अर्थ कथेद्वाराच लागू शकतो असा

अट्टहास धरतो. त्याने सांगितलेल्या कथेचा (एका मुलीच्या लग्नाच्या गोष्टीचा) अर्थदेखील असाच कथानकात दडून राहतो. शेवटी 'नैसर्गिक' आणि 'कल्पित' यांच्यातील फरक स्पष्ट नसून दोन स्वरांमधील मींडसारखा अखंड समोर येतो. 'मध्यलोक' कथेत संतोष उन्हाळ्याच्या सुट्टीत त्याच्या आजीकडे जातो आणि तेथील मुलामुलींबरोबर खेळतो, भांडतो. एक नवीन घड्याळ घालतो. आणि घरातील एका बंद खोलीत त्याला एक मुखवटा सापडतो. या कथेतून काळ आणि निसर्ग, साध्या बोत दडलेल्या भविष्याचा क्रम, निसर्ग आणि काळातील अनिवार्यता, या सर्व कल्पना गुंफल्या जातात.

संग्रहातील अजून एक श्रेष्ठ कथा 'गढी' ही एकच त्यामानाने 'पारंपरिक' कथानकाची आहे. विदेशातून मायदेशी परतलेला अभ्यासक प्र आपल्या संस्थेच्या लायब्ररीच्या नियमांना प्रथम वैतागतो. मग त्यांना समजून घेऊन त्यांना शरण जाऊन अधिक कडक करायचा प्रयत्न करतो. लायब्ररीत स्वातंत्र्य शोधणारा अभ्यासक शेवटी तिथे ज्ञानाची दडपशाही स्थापन करतो. भारतातील विद्यापीठांच्या वाचनालयाची अगदी जुजबी ओळख असलेल्यांनासुद्धा कथेतील लायब्ररी लगेच ओळखीची वाटेल. व्यवस्थापनाच्या वर्णनातून आधुनिक शिक्षणक्रमाची विविध शास्त्रांत कडक विभागणी व बारीक, क्षुद्र नियमांमुळे ज्ञानार्जनाची होणारी घुसमट लक्षात येते. संकल्पनेत वाचनालय ही ज्ञानार्जनाची मोकळी जागा असली तरी ती वाचन, अभ्यास, विद्यार्थी आणि पुस्तकांच्या अनुशासनाचे स्थळ बनते. ही कथा वाचताना अमिताभ कुमार यांचे 'बॉबे, लंडन, न्यूयॉर्क' पुस्तकातील एक मार्मिक निरीक्षण आठवले: पुस्तकाला कधीही पाय लावू नये, पुस्तक सरस्वतीचे रूप असते, असे मानणाऱ्या भारतात वाचनालयांची अत्यंत दयनीय अवस्था असते. उलट, प्रातर्विधीसाठी कागदाचा वापर करणाऱ्या पाश्चात्त्य जगात मात्र पुस्तके अतिशय काळजीने जपून ठेवली जातात. कथेत प्रसारख्या दडपशहाने तयार केलेले अंधेरनगरी वाचनालयाच्या दैनंदिन परिस्थितीचे खरेच अतिरेकी निरूपण आहे का? प्र शेवटी याच सिस्टीमला शरण जातो, पण त्याचे जुने स्वत्व मधूनमधून प्रश्न विचारून बंड पुकारत राहते.

एकूण, बागड कथा या लेखनप्रकाराच्या पायाशी असलेल्या काही मूलभूत संकल्पनांचा- विलास सारंगांच्या शब्दांत सांगायचं तर- 'कथेच्या कथापणाचा'- शोध घेतात. लेखकाच्याच आंतरिक प्रवासाचे दर्शन घडवून, सर्व लेखन हे एक प्रकारे प्रवासवर्णनच असल्याची कल्पना मांडतात. पण हे या कथासंग्रहाचे 'तात्पर्य' म्हणता येणार नाही. उलट, कथा या लेखनप्रकारातील अगणित अर्थ आणि शक्यता तयार करण्याच्या क्षमतेकडे लक्ष वेधणारा हा कथासंग्रह आहे. एक वाचक म्हणून मला सुचलेले हे त्यातील काही विचार आहेत. अन्य वाचकांना त्यातून निश्चितच वरेच वेगळे मिळेल. मोजक्या शब्दांत दाट वातावरण निर्माण करणे ही बागडांच्या शैलीची जमेची बाजू आहे. उदा. लहान शहरातील सरकारी संस्थेच्या आवारातील क्वार्टरांचा शांत परिसर, ओसाड जमीन, रस्त्यावरील दुकानांच्या रांगा, मित्र-मैत्रिणींमधील वागणुकीत अचानक बदल आणि खासकरून उन्हाळ्याच्या दुपारी अंधारखोलीत जाणवणारा कोंदट उकाडा. साध्या, दैनंदिन क्रमाच्या वर्णनात श्याम मनोहरांचा प्रभाव जसा जाणवतो, तसाच ॲब्स्ट्रॅक्ट उताऱ्यामधे विलास सारंगांचा. पण एक-दोन अपवाद वगळता या दोन्ही कथाकारांपेक्षा या संग्रहातील बहुतेक कथा अधिक ॲब्स्ट्रॅक्ट आहेत. एकाच फटक्यात क्रमाने वाचण्यासारख्या या कथा नाहीत, पण पुनर्वाचनातून एकूण कथांमधील धागेदोरे स्पष्ट होत जातात.

कितीही ॲब्स्ट्रॅक्ट कथानक असले, तरी बागडांच्या बहुतेक कथांमधली पात्रे स्पष्ट होतात, भावतात. पात्रांचे कथानकाशी विशिष्ट नाते असते का, हा प्रश्न पहिल्याच कथेत उद्भवतो. मोहनराव हे पात्र परिचित मध्यमवर्गीय सांस्कृतिक संदर्भ घेऊन वाचकासमोर येते, तर हीना या पात्राला तसला काहीच आधार कथेत नसतो. ती अरसिक, उपरी, उथळ वाटते. अशा बाह्यवर्णनातून पात्राची अस्सलता आपण जाणून घेऊ शकतो, की कथानकात समाज, मूल्य आणि लिंगभेदाबद्दल ढोबळ आणि सरसकट कल्पना मांडायला पात्रे ही निमित्तमात्र असतात, हा पुढचा प्रश्न उपस्थित होतो. ठराविक भौगोलिक, सांस्कृतिक संदर्भातूनच जर पात्र मूर्त होत असेल तर कथेची अस्सलता अशाच संदर्भांवर अवलंबून असते का, हादेखील मुद्दा आहेच. शेवटी, 'एक स्पष्ट गोष्टी'तली हीना, 'मध्यलोक'मधला संतोष, 'छंदोभंग'मधील इंद्राणी, निसर्गाचा अर्थ शोधणारा मनोज, आपले अस्तित्व एका खोक्यात बंद करून नव्या ठिकाणी पुनर्जन्म घेणारा शेखर, महत्त्वाकांक्षी लायब्ररियन ही पात्रे बराच काळ मनात घर करून बसतात. त्यांच्या सुरेख मूर्ततेला कथेतल्या निवेदकाच्या अनिश्चिततेने, कथानकातील व्यत्ययांनी, शक्यतांनी कितीही वार केले, तरी ही पात्रे बऱ्यापैकी आपले अस्तित्व वाचकासमोर शाबूत ठेवतात. बागड शोधू पाहत आहेत ते लेखकाच्या नियंत्रणाबाहेरचे कथेचे स्वतंत्र अस्तित्व हेच असावे का? ◆

**प्राची देशपांडे**
prarochana@gmail.com



**आस्वाद**

सु. म. तडकोडकर




# कवितेचा शोध
## कविताविषयक तात्त्विक ऊहापोह

**प्रा. वसन्त पाटणकर हे मराठी समीक्षा क्षेत्रातील एक महत्त्वाचे नाव. त्यांचे कविताविषयक तात्त्विक ऊहापोह करणारे 'कवितेचा शोध' हे अलीकडच्या काळातील एक महत्त्वाचे पुस्तक. या पुस्तकाचा परिचय करून देणारा लेख.**

बई विद्यापीठातील मराठी विभागाचे सेवानिवृत्त प्राध्यापक वसन्त पाटणकर यांनी मराठी कवितेच्या व समीक्षेच्या क्षेत्रात वाखाणले जावे इतके नाव खचितच संपादले आहे. या दोन्ही क्षेत्रांतील त्यांचा वावर अत्यंत वृत्तिगांभीर्यपूर्वक असतो, हे सवंधितांना ज्ञात आहे. मूलतः प्रा. पाटणकर हे कधी काळच्या मौज संप्रदायाशी संबंधित असल्याने त्यांची भूमिका निश्चित स्वरूपाची असली तरी त्यांचा दृष्टिकोन अत्यंत प्रांजल व निकोप असल्याने त्यांची संवेदनशीलता सर्वच साहित्यिक विचारांच्या संदर्भात स्वागतशील स्वरूपाचीच असते. त्यांच्या या वृत्तिगांभीर्याचे प्रतिबिंब त्यांच्या लेखनातही उमटत असते.

त्यांची विशेष मिरासदारी कवितेच्या प्रांगणात. त्यांचा मौज प्रकाशन गृहाने प्रकाशित केलेला 'विजनातील कविता' हा कवितासंग्रह आजही अभ्यासकांना महत्त्वाचा वाटतो. त्यांचे 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता (१९४५-६०)' हे संग्राह्य संपादन साहित्य अकादमीने प्रकाशित केले आहे. साहित्यसमीक्षा हा पाटणकरांचा विशेष आस्थेचा विषय आहे. अन्य चोखंदळ समीक्षकांचे आकलन करून घेणे पाटणकरांना विशेष मानवते. त्यांचे 'ग. स. भाटे : एक वाङ्मयसमीक्षक' हे एक संग्राह्य पुस्तक आहे असे विद्वन्मान्य सूचिकार व समीक्षक डॉ. सु. रा. चुनेकर यांच्यासारख्या अभ्यासकांनाही वाटत आले आहे. पॉप्युलर प्रकाशन या आणखी एका नामवंत संस्थेने पाटणकरांचा 'द. ग. गोडसे यांची कलामीमांसा' हा (सरोजिनी वैद्य यांच्या सोबत) संपादित केलेला लेखसंग्रह प्रकाशित केला होता. संवंधित अभ्यासकांना साहित्यशास्त्राविपयीची सैद्धान्तिक जाणीव अवगत करून देऊन त्यांना अद्ययावत करू पाहणारा पाटणकरांचा ग्रंथ म्हणजे पद्मगंधा प्रकाशनाने वाचकांच्या हातात दिलेला 'साहित्यशास्त्र- स्वरूप आणि समस्या' होय.

प्रा. पाटणकर कविता आणि कवितेचे रूप या विपयाच्या संदर्भात सतत सर्वंकष स्वरूपाचे वाचन करीत असल्याने त्या संदर्भात अनवरतपणे चिंतन करीत असतात. पण, ते स्वयंतुष्ट नाहीत. परिणामी, आपली भूमिका अनेक वेळा, अनेक पद्धतीने तपासून घेत असतात. त्या भूमिकेच्या अनुषंगाने आपण योग्य तशी मांडणी करू शकत नाही आहोत, अशी खंत व्यक्त करणारी जाणीव होऊ लागल्यास ते पुनश्च तीस न्याय देऊ पाहणारी सैद्धान्तिक मांडणी करू पाहतात. पाटणकरांच्या ह्या अशा स्वरूपाच्या वृत्तिगांभीर्यांचा प्रत्यय म्हणजे मुंबई विद्यापीठातील मराठी विभाग व मौज प्रकाशन गृह यांच्या संयुक्त विद्यमाने अलीकडच्या काळात प्रकाशित झालेले त्यांचे 'कवितेचा शोध' हे पुस्तक.

या पुस्तकातील विचारांची बैठक कशी होती अन् कशी पुनर्सुधारणा होत गेली याविषयीचे स्पष्टीकरण करण्यासाठी पाटणकर लिहितात :

'कविता : संकल्पना, निर्मिती आणि समीक्षा (१९९५) या पुस्तकात कवितेच्या संकल्पनेविषयीची मी जी मांडणी केली होती ती मला समाधानकारक वाटत नव्हती. एक तर या पुस्तकातील 'कवितेची संकल्पना' या लेखाचे स्वरूप कवितेच्या वेगवेगळ्या सुट्या वैशिष्ट्यांची चर्चा असे झाले आहे, असे वाटत राहिले; परंतु त्या सर्व वैशिष्ट्यांना बांधणारे सूत्र कोणते ते येथे स्पष्ट होत नाही, असे लक्षात आले. दुसरे म्हणजे हे सर्व विवेचन प्रामुख्याने विशिष्ट




अनुक्रमणिका

प्रकारची कविता डोळ्यांसमोर ठेवून केले आहे, सर्व प्रकारच्या कवितेसाठी हे विवेचन पुरेसे नाही, ही जाणीवही होत होती.'

जेव्हा समीक्षकाची भूमिका अशी स्वतःलाच तपासत असते तेव्हा ती त्याच्या वृत्तीतील चोखंदळपणाची खूणही दर्शवीत असते. पाश्चात्त्य समीक्षकांनी नेमके हेच केले. पंधराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंतचा पुनर्जागरणाचा काळ असाच, प्रचलित मूल्यांच्या (धार्मिक व राजकीय) संदर्भात असमाधानी वाटत राहिल्याने तिथल्या साहित्य समीक्षकांनाही स्वतःतील प्रांजल भूमिकेला ढवळून काढावे असे वाटायला लावणारा तो कालखंड होता. जॉन कालेट, इरास्मस आणि जॉन लुई विवेस यांच्यामुळे पाश्चात्त्य समीक्षा विचार हा नेहमी वर्धिष्णू राहिला. सौंदर्यवादी विचारांचा पुरस्कार करणाऱ्या हेरॉल्ड ब्लूमने तर समीक्षकांनी शेलीची कविता वाचण्यात कशी कुचराई केली याकडे संबंधितांचे लक्ष वेधले. प्रा. पाटणकरांनी काव्यातील 'अनेकार्थता' (ॲम्बिग्युइटी) व 'एकार्थता' ह्या संकल्पनांविषयीचे आत्मपरीक्षण केले व तशी भूमिका तपासून घेतल्यानंतरच तिचा पुरस्कार केला.

विषय कोणताही असो, त्याच्या तर्कशुद्ध व व्यासंगपूर्ण मांडणीला आपण शास्त्र म्हणू शकतो; परंतु प्रा. पाटणकरांना तर्कशुद्ध व व्यासंगपूर्ण चिंतनाची मांडणी करीत असतानाही 'कवितेचा शोध'मध्ये, काव्यविषयक चिंतनाद्वारे काव्यशास्त्र रचावयाचे आहे असे वाटत नाही. त्यांना अभ्यासकास परंपरेचा शोध घेत काव्यविषयक चिंतन करायला भाग पाडायचे आहे, असेच स्पष्टपणाने दिसते.

कविता ही अनवरतपणे जाणिवेच्या स्तरावरील निर्मितीचे फलित असते. त्यामुळे कवितेचा अभ्यास करीत असताना आपण सर्वसाधारणपणे विशिष्ट शब्दांचा क्रम पाळणारा सौंदर्यात्मक (अनेकार्थत्व अन् विसंगत्व) असलेला भावाविष्कार म्हणजे कविता, असे मानत असतो. 'अर्थक्रियोपेत्काव्यम्' अशी नाट्याचार्य भरतमुनींनी नाट्याच्या संदर्भात काव्याची व्याख्या केली आहे. कवितेचा शोध घेण्याचे वेड हे प्राचीन काळापासूनचे आहे. त्यात काव्याची व्याख्या, काव्यप्रकार, काव्यमार्ग, गुण-दोष, अलंकार, चित्रबंध आणि प्रहेलिका हे विषय चर्चिले आहेत. ते भारतीयांना, ग्रीकांना आणि अन्य पाश्चात्त्यांना प्रलोभित करणारे विषयक्षेत्र आहे.

मराठीत या विषयाच्या अनुषंगाने काही विद्वानांनी आपली मते अधोरेखित केली आहेत. रा. श्री. जोग, सुधीर रसाळ, चंद्रकांत पाटील, यांनी सैद्धान्तिक स्वरूपाचे ग्रंथलेखन केले आहे. त्यामुळे अभ्यासकांस तात्त्विक चर्चा वाचावयास मिळतात. मंगेश पाडगावकर यांनी 'शोध कवितेचा' या आपल्या पुस्तकात आस्वादविषयक जाणिवा अधोरेखित केल्या आहेत. तसे पाहिले तर अन्य कैक संग्रहवजा पुस्तकांतही कवितेवरील अभ्यासपूर्ण लेख आढळू शकतात. पण ते सर्व 'क्वीकी' आहेत हे वेगळे सांगायला नको.

प्रा. पाटणकरांचे 'कवितेचा शोध' हे पुस्तक म्हटले तर कविताविषयक तात्त्विक ऊहापोह करणारा एक लेखसंग्रह आहे, अन् त्यातील मध्यवर्ती ध्वनिसूत्र घेऊ पाहिल्यास ते एकसंध पुस्तक आहे, असेही म्हणायला वाव आहे.

या पुस्तकात 'कवितेचा शोध' (७४ पृष्ठे), 'कविता : लयबद्धता आणि सांगीतिकता' (२९ पृष्ठे), 'कवितेची अनेकार्थता' (२० पृष्ठे), 'कवितेतील दुर्बोधता' (३५ पृष्ठे), 'कवितेतील प्रयोगशीलता' (१८ पृष्ठे) आणि 'कवितेतील वैचारिकता' (२० पृष्ठे) असे केवळ सहाच लेख आहेत; परंतु लेखाशी संबंधित असलेली पृष्ठसंख्या ध्यानात घेतली की प्रा. पाटणकरांनी या विषयांच्या तात्त्विक जाणिवा व्यवस्थितपणे अधोरेखित व्हाव्यात म्हणून ऐसपैस बैठक स्वीकारलेली दिसते.

'कवितेचा शोध' या लेखात लेखकाने आरंभी 'साहित्यप्रकार' ह्या वादग्रस्त संकल्पनेचे (इसेन्शियली कण्टेस्टेड कन्सेप्ट) स्वरूप कसे असते व त्यास सांस्कृतिक व ऐतिहासिक कारणे कोणती असतात याविषयीचे स्वतःचे मत अधोरेखित केले आहे. त्यानंतर कविता या लेखनप्रकाराचे स्वरूप निश्चित करण्यासाठी भारतीय तसेच पाश्चात्त्य परंपरेतील या वाङ्मयप्रकारात कोणकोणते काव्यप्रकार सामावता आले आणि येत आहेत याविषयीचा माहितीवजा परामर्श घेतला आहे. या विषयीचे सविस्तर स्वरूपातले आकलन पाटणकरांनी आपल्या 'साहित्यशास्त्र : स्वरूप आणि समस्या' या पुस्तकात घेतले आहे.

कविता या लेखनप्रकाराविषयीच्या विविध व्याख्यांचा परिचय करून दिल्यानंतर पाटणकर यांनी डॉ. सुधीर रसाळ, प्रा. रमेश तेंडुलकर, प्रा. गंगाधर पाटील, डॉ. चंद्रकान्त पाटील, डॉ. मिलिंद मालशे, डॉ. अशोक केळकर यांनी या संदर्भात मांडलेल्या वैचारिक सूत्रांची नोंद घेतली आहे. त्या परिचयाच्या निमित्ताने डॉ. रसाळांची 'कविता म्हणजे प्रतिमांची सेंद्रिय संघटना' ही व्याख्या स्वीकारली गेली तर कित्येक कथा-काव्य, आख्यान-काव्य, पोवाडा

अशासारख्या रचनांचा, त्यात प्रतिमांचे साहचर्य नसल्याने त्यांचा समावेश 'काव्या'त करता येणार नाही, तर कित्येक कथनात्मक रचनांत प्रतिमांची संघटना असली तरी आपण त्यांचा समावेश काव्य या संकल्पनेत करीत नसतो, या वस्तुस्थितीकडे संबंधितांचे लक्ष वेधले आहे. तसेच प्रा. तेंडुलकर यांनी कवितेचे मूळ कोणते असावे या प्रश्नाचा वेध घेताना कवितेची विशुद्धताही ध्यानात येऊ शकेल. ज्या शक्यतेचा सांस्कृतिक, कलात्मक आणि व्यावहारिक परिप्रेक्ष्यांतून शोध घेण्याच्या दिशेने अंगुलिनिर्देश केला होता, त्याकडेही पाटणकरांनी अभ्यासकांचे लक्ष वेधले आहे. असे केल्याने काव्याच्या विविध संकल्पना कशा काय आकाराला येतात, याविषयीचे उद्‌घाटन होऊ शकेल, असे म्हटले आहे. याच लेखाच्या तृतीय भागात भारतीय व पाश्चात्त्य काव्यरचनांची उदाहरणे देत या म्हणण्याचा परामर्श विस्तृतपणे घेतला आहे.

तत्पूर्वी हाच विचार पुढे नेताना पाटणकर मिशेल रिफ्फातेरीच्या 'सेमियॉटिक्स ऑफ पोएट्री'त नोंदविलेल्या कवितेचा अर्थ आणि अर्थवत्ता उलगडणाऱ्या चिन्हमीमांसेविषयीची नोंद घेऊन मराठीतील प्रा. पाटील यांनी या व्यवस्थेची मांडणी केली होती, याविषयीचे स्मरण करून देतात अन् प्रतिमा-प्रतीक यांचे अस्तित्व काव्यापेक्षा अन्य साहित्यप्रकारांत अधिक प्रमाणात आढळून येऊ शकते असे सांगतात.

कवितेचा शोध घेत असताना कवितेच्या वेगवेगळ्या काळांतील संकल्पना, तिचे संस्कृतिविशिष्ट असणारे विविध प्रकार यांचा संदर्भ सामग्र्याने ध्यानात घेऊन त्यांच्यातील साम्यभेदात्मक संबंध न्याहाळता येणे शक्य आहे व त्यास लुडविग विट्‌गिन्स्टाइन या तत्त्ववेत्त्याने मांडलेली 'कुलसाम्या'ची संकल्पना पूरक ठरू शकेल, असे पाटणकर यांनी सुचवले आहे.

याच लेखाच्या द्वितीय भागात पाटणकरांनी आत्मपर (भावना, अनुभव, विचार) आणि अनात्मपर कविता असे वर्गीकरण करून काव्याच्या निर्मितीत कवीच्या व्यक्तिमत्त्वाचे महत्त्व अधोरेखित करण्याच्या मिषाने त्याच्या आत्मपरत्वतेचे स्वरूप मांडले आहे. सौंदर्यवादाच्या संदर्भात, विशेषतः विशुद्ध काव्याविषयीचे आकलन करून घेण्यासाठी अशा वर्गीकरणाचे महत्त्व अधोरेखित करण्यास वाव असतो. याच संदर्भात कवितेतील प्रतीके व प्रतिमा यांच्यावर व्यक्तिगततेचा वैशिष्ट्यपूर्ण संस्कार होत असतो (उदा. पुरुषोत्तम शिवराम रेगे यांनी निर्माण केलेली राधेची मिथ) अन् (बालकवीसारख्यांचे) काव्यव्यक्तिमत्त्वही त्यांच्या काव्यरचनांद्वारे दृग्गोच्चर होते, परंतु रेगे व मर्ढेकर यांचे तसे होत नाही, तर अनात्मपर (समूहपर) कवितेत विशिष्टता आणि पृथगात्मता या संबोधनांना तसे स्थान नसले तरी त्यास सादरीकरणाचे ठसठशीत अंग लाभलेले असते, जे आत्मपर कवितांना नसते, असे सुचविले आहे. प्रा. पाटणकरांच्या मतानुसार आत्मपरत्वतेत वर्णनपरता, कथनपरता, नाट्यपरता ही सर्व सामावलेली उपांगे होत, असे दिसते. येथे प्रा. मालशे यांनी साहित्यप्रकार या संकल्पनेच्या संदर्भात मांडलेल्या एका उपपत्तीचा संदर्भ आहे हे स्पष्टपणेच दिसते.

आत्मपरतेविषयीचेच आकलन मांडताना प्रा. पाटणकर यांनी कवितेतील स्वर या संकल्पनेचा संबंध बाख्तीनला अभिप्रेत असलेल्या बहुस्वरीयता या विचाराकडे कसा आहे ते स्पष्ट केले आहे. कवितेचा अनुबंध आंतरिकतेत असल्याने स्वाभाविकपणे तिचा वर्णनपरत्व (अल्पाक्षरत्व, अनेकार्थत्व, दृश्यत्व, लयबद्धत्व, सेंद्रियत्व, संवेद्यत्व) प्रकृतीविषयीचा विचार करणे ओघानेच येते. त्याची नेटकी मांडणी प्रा. पाटणकरांनी केली आहे.

या लेखाच्या तृतीय भागात 'आत्मपर कविता म्हणजेच कविता' या विधानाच्या स्वीकारामुळे उद्‌भवू शकणाऱ्या समस्यांविषयीचे सूचन करण्यात आले आहे. कवितेच्या निर्मितीविषयीचे ऐतिहासिक सर्वेक्षण केले तर कवितेतील अनात्मपरतेचे पारडे अधिक जड होऊ शकेल, याविषयीची भीती पाटणकर व्यक्त करतात.

या पार्श्वभूमीवर कविवर्य बाळकृष्ण भगवंत उपाख्य बाकीबाब बोरकर यांच्यानंतरचे मराठीतील ज्येष्ठ कवी मंगेश पाडगावकर यांच्या 'कवितेचा शोध' या पुस्तकाचा संदर्भ घेण्याचा मोह टाळता येत नाही. पाडगावकरांचा शाळकरी वयापासून काव्यप्रवास चालूच आहे. त्यांच्या काव्यात्मकतेने तरल, संवेदनाक्षम आणि कोमल आंतरिकतेद्वारे काव्यशिल्प निर्माण केले. पाडगावकरांच्या गद्यलेखनाचा समावेश असलेली 'स्नेहगाथा', 'चिंतन' व 'आले मेघ भरून' ही पुस्तके एकत्रित प्रकाशित झाली आहेत. या कवीचे अस्मिता मोहिते व संगीता बापट यांनी संपादन केलेले हे पुस्तक म्हणजे त्यांनी ठिकठिकाणी केलेली भाषणे व प्रसंगपरत्वे केलेल्या लेखनाचा संग्रह असून पॉप्युलर प्रकाशनाने तो प्रसिद्ध केला आहे.

कविवर्य पाडगावकर हेही आधी विद्यापीठीय स्तरावरले अध्यापन करीत असत. पाडगावकरांसारखे प्रा. पाटणकरही

अनुक्रमणिका

एक चांगले कवी आहेत. पाडगावकरांनीही कवितेची निर्मिती, कवितेचे आचारविचार, कवितेचा सन्मान आदींचा शोध घेतला आहे. त्या निमित्ताने 'आपल्या काव्यनिर्मितीच्या तळाशी आत्मशोध असतो' हे सूत्र आपल्या मनाशी बाळगून पाडगावकरांनी ही विचारनिर्मिती केली. ती करताना काव्याचा दर्जा, कवितेतील शब्दांचे वजन, त्यांचे महत्त्व आदी गोष्टी त्यांनी कटाक्षाने जपल्या, असे त्यांचे म्हणणे आहे.

पाडगावकरांच्या मतानुसार व्यवहारात जी भाषा आपण वापरतो ती साधनरूप असते. जे सांगायचे आहे ते कळले की ते सांगणारे वाक्य उरत नाही. त्याचे कार्य संपल्यामुळे ते वाक्य कायमचे लुप्त होते; पण साहित्यातील कलाकृती निर्माण करणारी भाषा अशी साधनरूप असतानाही त्या भाषेचा पोत वेगळा घडतो. तो कलाकृतीचा माध्यम बनतो. यावरून पाटणकरांच्या लेखनाला सैद्धांतिक बैठक लाभलेली असून पाडगावकरांच्या वैचारिकतेत सौंदर्यवादी आस्वादनपरता रिघलेली आहे, हा भेद ध्यानात घ्यायला हवा.

सौंदर्यवादाचा स्वतःचा एक प्रवाह असून त्याने पुरस्कारलेल्या प्रतिमा व प्रतीक यांच्या आवश्यकतेला भरघोस पाठिंबा लाभला व त्यातून चळवळच उभी राहिली, तशी कालमाध्यमाशी संबंधित असलेली अतिवास्तवतावादाची चळवळ काव्यावर प्रभाव टाकत असली तरी तिचा स्वतंत्र प्रवाह दाखविता येत नाही, याकडे पाटणकर अभ्यासकांचे लक्ष वेधतात. त्यांच्या मते मराठीतील मानवतावादी शरच्चंद्र मुक्तिबोध, नामदेव ढसाळ यांनी अतिवास्तवतावादी लेखनतंत्राचा उपयोग केला, तसेच दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, विलास सारंग अशा कवींच्या लेखनावर अतिवास्तवतावादाचा प्रभाव दिसतो.

या पार्श्वभूमीवर प्रा. पाटणकर म्हणतात, की कवितेची अनेक रूपे पाहिली की केवळ आत्मपरत्व अन् एकच सत्त्वाच्या आधारे तिची व्याख्या करणे अवघडच आहे. तिला संस्कृत साहित्यशास्त्राच्या आधारे (नाटक श्रेष्ठ, अन्य कनिष्ठ- भरतमुनी; काव्य श्रेष्ठ, अन्य कनिष्ठ- आनंदवर्धन) श्रेणीव्यवस्था लाभकारी वाटत आली असली तरी ती उपयुक्त नाही, कारण तिच्याद्वारे केवळ वैशिष्ट्ये दृग्गोच्चर होऊ शकतात, मूल्यमापन होऊ शकत नाही.

कवितेच्या व्याख्येविषयीची अशी विस्तृत साधक-बाधक चर्चा केल्यानंतर पाटणकर कवितेच्या आकृतिबंधाचा विचार करू पाहतात. मध्ययुगीन मराठी संतकाव्य म्हणजे आंतरिकतेचा उत्कट आविष्कार असल्याने, त्यातही ते स्फुट स्वरूपात आढळत असल्याने ते भावकवितेच्या स्वरूपाचे तर नव्हेत, असा विचार पुढे सरकतो. पंतकाव्याचा विचार मात्र किंचित वेगळ्या दृष्टिकोनातून करताना पाटणकर सुचवतात, की मध्ययुगीन दीर्घ रचनांतील कथाकाव्य (आख्यानकाव्य) आणि भाष्यकाव्य यांचे नवअभिजातवादाशी नाते असल्याचे दिसते. नादानुकूल शब्दयोजना असलेल्या 'दासबोधा'त अर्थाधिक्य निर्माण करणारी रूपकप्रक्रिया दिसते.

या लेखात कवितेचा शोध घेत असताना अनेकांच्या मतांचा परामर्श व त्यांची पुष्टी घेत पाटणकरांनी आत्मपर व अनात्मपर काव्यरचनेत असलेली संवेद्यता उमलून घेतली व ती साधार सांगण्याचा प्रयत्न केला आहे, असे खचितपणे म्हणता येते.

'कविता : लयबद्धता आणि सांगीतिकता' या लेखात काव्यातील भाषिक विशेषांचे स्वरूप कोणते असते याविषयीची साधक-बाधक चर्चा केली आहे.

लयबद्धत्व आणि संगीतिकत्व हे विशेष काव्याचे आहेत की गेयतेचे- गायनाकूलतेचे आहेत, पद्याचे आहेत की गद्याचेही आहेत, दृश्यात्मक आहेत की श्रुतीशी संबंधित आहेत याविषयीचा विचार या लेखात अपेक्षित आहे.

आरंभीच पाटणकर यांनी लयबद्धता ह्या संज्ञेविषयीची सर्वसामान्यपणे जी उमज आहे ती मांडली आहे. संरचनात्मक व पाठ्यात्मक वाचन करण्यास वाव देणारी व कविता म्हणजे सेन्द्रिय संघटन आहे, असे न्यू क्रिटिसिझम मांडणारे लुइसान राज्य विद्यापीठातील विद्वान समीक्षक क्लिअन्थ ब्रुक्स व त्यांचे सहकारी रॉबर्ट पेन्न वॉरेन यांनी आपल्या 'अण्डरस्टॅण्डिंग पोएट्री' या विद्वन्मान्य ग्रंथात 'लय' या संज्ञेच्या संदर्भातील मांडलेली ठसठशीत व्याख्या उद्धृत केली आहे ती अशी : The repetation in time of perceptable pattern.

त्यामुळे पाटणकरांनी माधवराव त्र्यंबक पटवर्धन ('छंदोरचना'), रेने वेलेक आणि ऑस्टिन वॉरेन, तेंडुलकर यांचा आधार घेऊन लय आणि छंद या दोन संज्ञांचे परस्परांशी कोणते नाते आहे, तसेच छंदोनिष्ठ लय उपरी मानायची का, आणि लयबद्धत्व व आत्मपरत्व यांतील परस्पर नाते कोणते, या प्रश्नांना भिडावे लागते हे अधोरेखित केले आहे.

पाटणकर यांनी कवितेतील सांगीतिकता या विषयावरील काही निरीक्षणे मांडली आहेत. आरंभी काही साधर्म्ये सांगून

अशोक रानडे यांचे मत नोंदविले आहे. रानडे यांच्या मते सांगीतिकेकडून काव्यात्मकतेकडे जाताना काव्यात्मकतेचे क्षेत्र विस्तारते आणि सांगीतिकेचे क्षेत्र उणे होत जाते. याचे कारण स्वर-लय-बंदिश या तिन्ही पदांना स्थान तिथे लाभत नाही.

पाटणकर या लेखाच्या शेवटी भावोत्कट गेय आणि छंदोनिष्ट काव्यात्मक रचना सांगीतिकेला जितक्या निकटच्या असतात, तितक्याच मुक्तशैलीतील कविताही तिला लगतच्या वाटू शकतात, अशा निष्कर्षापर्यंत आले आहेत.

कवितेची अनेक अर्थ प्रकट करण्याची क्षमता हा नेहमीच अचंबेचा विषय झाला आहे. विल्यम एम्पसन हा एक इंग्रज साहित्य समीक्षक. त्याच्या 'सेव्हन टाइप्स ऑफ ॲम्बिग्युइटी' (१९३०) या पुस्तकाच्या माध्यमातून त्याने विसाव्या शतकातील अत्यंत प्रभावी विधान केले. त्याच्या मतानुसार साहित्यिकाच्या चित्तात चाललेल्या संघर्षामुळे सात प्रकारची अर्थवलये निर्माण करण्याची क्षमता निर्माण होते. तेच सूत्र 'कवितेची अनेकार्थक्षमता' ह्या पाटणकरांच्या लेखातही आढळते. ते अन्य विचारवंत व्हिक्तोर श्कलोव्हस्की, यन मुकॉरॉव्हस्की यांचाही साक्षेपाने संदर्भ घेतात. ते वाचकाच्या आकलनक्षमतेविषयीचा विचार करतात (येथे वाचक प्रतिसाद सिद्धान्त अत्यंत महत्त्वाची भूमिका पार पाडतो.); परंतु त्याच ओघात कवींच्याही अंगाने अनेकार्थत्वाचा विचार मांडतात. ही समर्थ अभ्यासकाच्या समतोलपणाची खूण होय. त्यांनी काही कवितांच्या संदर्भात एकच काव्यार्थ अनेक प्रकारे फुलविला जातो, तर काही कवितांबाबत भिन्न काव्यार्थ शक्य होतात, असे म्हटले आहे.

काव्यबोध झाला नाही की काव्याच्या आकलनात दुर्बोधत्व येते. कविवर्य पुरुषोत्तम शिवराम रेगे यांनी आपल्या 'छांदसी' या समीक्षापर लेखसंग्रहात 'आधी शब्द, मग अर्थ' अशी भूमिका घेतली आहे. शब्दाद्वारे अनुभवाचा बोध झाला पाहिजे, तीच तर केवळ काव्याची खूण, असे त्यांचे प्रतिपादन होते. 'कवितेतील दुर्बोधता' हा विषय म्हणजे कित्येक रसिकांना छळणारा अनुभव होय. मर्ढेकरांचा संप्रदाय हा एक क्लिष्ट संप्रदाय असल्याचे मानले गेले ते याच कारणामुळे. त्यास प्रतिसाद म्हणून दुर्बोधता हेच नवसाहित्याचे व्यवच्छेदक लक्षण असल्याचेही प्रतिपादले गेले. कवितेवरील निवेदन वाचण्यापेक्षा कविताच वाचलेली बरी, असेही कित्येकजण म्हणतात. म्हणजे कवितेतील दुर्बोधता हा विषय केवळ छळणारा नसून लेखनातील दुर्बोधता हा अगतिक करणारा घटक आहे. नि:संदिग्धता हा गुण काव्यात असायला हवा, असे मानणारे हे विसरतात, की अनेकार्थत्व आणि विसंगती, दुर्बोधता हा काव्याचा अविभाज्य गुण आहे. त्यामुळेच कविता ही वैशिष्ट्यपूर्ण होत असते. पाटणकरांच्या मते अनेकार्थत्व आणि दुर्बोधत्व या संज्ञा समानार्थी नव्हेत. या संदर्भात ते जोनाथन कलरने मांडलेली 'साहित्यिक क्षमता' या संकल्पनेचा परिचय करून देतात.



कवितेचा शोध
प्रा. वसंत पाटणकर
मराठी विभाग (मुंबई विद्यापीठ)
आणि मौज प्रकाशन गृह
पृष्ठे : १२+२१२
मूल्य : २२० रुपये.

पाटणकरांनी काव्यात दुर्बोधत्व का येते, काव्यातले दुर्बोधत्व का जाणवते याविषयीचा ऊहापोह केला आहे. या प्रश्नांच्या मागे कारणे कोणती, असा प्रश्न विचारला तर कवीच्या अवतीभोवतीचे 'वास्तव' आणखी 'अतिवास्तव' दृश्य निर्माण करण्याचा कवीचा हेतू, अशीही काही कारणे समोर येतात. त्यांनी या संदर्भात रेगे, करंदीकर, जोग, रसाळ यांच्याही मतप्रतिपादनाचा आधार घेतला आहे.

या लेखाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे या केन्द्रवर्ती विषयाच्या अनुषंगाने मराठी कवितेतील चित्रे, कोलटकरादी कवींच्या काव्यात्मक स्वरूपाचीही विश्लेषणे व संश्लेषणे वाचण्यास मिळतात. त्याद्वारे पाटणकर यांच्या व्यासंगाचाही पुनश्च परिचय होतो.

'कवितेतील प्रयोगशीलता' हा लेख अनेक दृष्टिकोनांतून उपयुक्त ठरतो. ऐतिहासिक परिप्रेक्ष्य, आशयाविषयीची दृष्टी, दृश्यात्मकतेचा संकेत या व अनेक कोनांतून हा विषय विवेचिला जाणे शक्य आहे. प्रयोगशील साहित्य म्हणजे कविता-कादंबरी लेखनातील सांकेतिकता मोडून काढून सादर केलेली नवी तंत्रबद्ध मांडणी होय. अशा प्रकारचे पहिले पाठ्य म्हणून लॉरेन्स स्टर्नचे 'दो लाइफ ॲण्ड ओपिनियन ऑफ ट्रिस्ट्रम 'शॅण्डो-जेण्टलमन' (१७५९)चा उल्लेख केला जातो. जेम्स बॉस्वेलने सॅम्युएल

जॉन्सनच्या चरित्रात जॉन्सनने The merely odd does not last असे म्हटल्याचे नोंदविले आहे. असे जरी असले, तरी साहित्यातील प्रयोगशीलतेने नवे नवे आयाम निर्माण केले, परिमाणे लाभू दिली, ही वस्तुस्थिती दृष्टिआड करता येणे अवघड आहे.

पाटणकरांनी काव्यातील प्रयोगशीलता न्याहाळण्याआधी प्रयोगशीलता ही संकल्पना उलगडून दाखविताना टी. एस. एलियटचे 'प्रयोगातील अपरिहार्यता हा दाब कवीच्या नियंत्रणापलीकडील असतो' हे मत अधोरेखित केले आहे. तसेच गो. वि. करंदीकरांनी 'यशस्वी प्रयोगामुळे काव्याची धारणशक्ती वाढली पाहिजे' असे आपल्या 'परंपरा आणि नवता'मध्ये तसेच रसाळांनी 'आविष्कारपद्धतीशी संबंधित असलेल्या परिवर्तनांना प्रयोग' असे म्हटले असल्याची नोंदही केली आहे.

त्यांनी हेच सूत्र पुढे नेताना काही महत्त्वाची विधाने केली आहेत. जी परिवर्तने, उदाहरणार्थ, वेगवेगळ्या वृत्तांची मिश्रणे करणे, काव्यपरंपरेत मान्य आहेत अशांचा अवलंब करणे म्हणजे प्रयोग नव्हे. त्यांच्या मतानुसार प्रयोग हे व्यापक आशयाशी संबंधित असले तरी सांकेतिकतेला आव्हान देणारा आशय प्रयोगशील (वा प्रायोगिक) असतो असे म्हणणे चमत्कारिक आहे. सौंदर्यवादी काव्यदृष्टी बाळगणाऱ्या महादेव मोरेश्वर कुण्टे यांनी आपल्या 'राजा शिवाजी' या अनात्मपरतेकडे झुकणाऱ्या कथाकाव्यात सर्वांत पहिला असा महत्त्वाचा प्रयोग केला; परंतु या प्रयोगातच अन्तर्विरोध असल्याने हा प्रयोग यशस्वी होऊ शकला नाही. तरीही पाश्चात्त्य जाणिवांत असलेल्या सौंदर्यवादी संप्रदायातील 'कविता ही स्वायत्त संघटना असते' या तत्त्वाचे रोपण मराठीत होऊ शकले. विज्ञान कथा-कादंबरीला प्रायोगिक आहे असे म्हणता येत नाही. प्रारंभीच्या सर्वच ग्रामीण-दलित साहित्याला (त्यातील आशय वेगळा असल्याने, तसेच) त्यातील अविष्कारपद्धतीत जाणीवपूर्वक केलेल्या परिवर्तनाला प्रयोगशील म्हणावे लागेल. सौंदर्यवाद व वास्तववाद या दोन संप्रदायांना नकार दर्शवीत आणि व्यक्तिवादी दृष्टीमधील स्वातंत्र्याच्या (म्हणजे अमर्याद, अनिर्बन्ध स्वातंत्र्य, कलेची व कल्पनाशक्तीची स्वायत्तता या) सूत्राला पराकोटीला नेण्यात आले, त्यातून आधुनिकवाद उभा राहिला.

पाटणकर यांनी या सूत्राला अनलक्षून केशवसुत, रविकिरण मंडळ, र. कृ. जोशी, विंदा करंदीकर, अरुण कोलटकर यांच्या प्रयोगशील कवितेचे संदर्भ घेतले आहेत.

पाटणकरांनी 'आत्मपर' व 'अनात्मपर' काव्याच्या वर्गाविषयी, त्यातील प्रयोगाविषयीचे विस्तृत विवेचन करून झाल्यानंतर अशा प्रयोगांतून नवी काव्यदृष्टी साकारत जाते, या फलिताला अधोरेखित केले आहे.

'कवितेतील वैचारिकता' हा लेख या पुस्तकातील म्हणजे काव्यालोकन विषयावर अलगदपणे ठेवलेले आयसिंगच होय.

अंतिमत: काव्याचा आणि प्रतिमा-प्रतीकांद्वारे उद्घाटित होऊ शकणाऱ्या वैचारिकतेचा अर्थाअर्थी संबंध कसा असू शकतो, या सतत छळणाऱ्या विषयास तटस्थपणे न्याहाळणे हे तसे सुलभपणाचे नसते.

त्यासाठी जणू पाटणकर वैचारिकता या संज्ञेचा परिचय करून देतात. त्यानंतर ते म्हणतात,

'विचार हे अंतिमत: साहित्यकृतीचे रूप सिद्ध करणारी सामग्री या स्वरूपाचे, म्हणजेच साधनात्मक स्वरूपाचे असते.'

या लेखातील 'कवितेतील वैचारिकता आणि तिचे काव्यमूल्य' हा भाग तर अभ्यासकाची जाणीव घडविण्यासाठीचे पाथेय होय, असे खचितपणे म्हणता येते. कवितेतून विचार व्यक्त झाले तरी विचारांची सुस्पष्ट तसेच संगतवार मांडणी करणे हे काव्याचे उद्दिष्ट नसते. विचारामुळे काव्याशय समृद्ध होणे, अर्थवत्ता वृद्धिंगत होणे, जीवनाविषयीची मर्मदृष्टी देणे आणि कविता प्रत्ययकारी होणे हेच अधिक महत्त्वाचे असते, अशा निष्कर्षानिशी या लेखाचे आणि पुस्तकाचे शेवटचे पान लिहिले गेले आहे.

या पुस्तकाचा लाभ केवळ विद्यार्थ्यांना व अध्यापकांना होऊ शकतो असे नसून कवितेविषयीची संवेदनशीलता बाळगणाऱ्या प्रत्येक व्यक्तीलाही होऊ शकतो, किंबहुना ऐंशीनंतरच्या पिढीतील या महत्त्वाच्या समीक्षकाची पत आणि त्याच्या लेखनाचा पोत ध्यानात घेण्याची अपरिहार्यताही या पुस्तकाने अधोरेखित केली आहे, असे म्हणता येते.

◆

**डॉ. सु. म. तडकोडकर**
चलभाष : ०९४२०५९५१३९

संदर्भ
१. प्रा. वसंत पाटणकर यांची ग्रंथसंपदा :
अ) विजनातील कविता, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९८३, (कवितासंग्रह)
आ) टी. एस. एलियट आणि मराठी नवकाव्य व समीक्षा, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, मुंबई १९९२ (सहकार्याने)

पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९७, (सरोजिनी वैद्य यांच्या सोबत संपादन - लेखसंग्रह)
ई) ग. स. भाटे : एक वाङ्मयसमीक्षक, प्रतिमा प्रकाशन, मुंबई, मूल्य १५० रुपये
उ) कविता : संकल्पना, निर्मिती आणि समीक्षा, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ व अनुभव प्रकाशन, १९९५
ऊ) अरुण कोलटकरांची कविता : काही दृष्टिक्षेप, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ व लोकवावाङ्मय गृह १९९८, मूल्य १०० रुपये (संपादन)
ए) मराठी कविता (१९४६-६०), साहित्य अकादमी, नवी दिल्ली, २००२, पृष्ठे २१८, मूल्य १३० रुपये, (संपादन)
ऐ) साहित्यशास्त्र - स्वरूप आणि समस्या, पद्मगंधा प्रकाशन, पुणे २००७, पृष्ठे २५०, मूल्य १६० रुपये (स्वतंत्र)
ओ) कवितेचा शोध, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ व मौज प्रकाशन गृह, मुंबई २०१२, पृष्ठे २१२, मूल्य २२० रुपये, (स्वतंत्र- लेखसंग्रह)
२. जोग रामचन्द्र श्रीपाद, अभिनव काव्यप्रकाशन, व्हीनस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३१३, मूल्य २५० रुपये
३. रसाळ सुधीर, कविता आणि प्रतिमा, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९८२, पृष्ठे ४८६, मूल्य ३५० रुपये
४. पाटील चन्द्रकान्त, कवितेसमक्ष, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, २००९, पृष्ठे २०८, मूल्य २०० रुपये
५. पाडगावकर मंगेश, शोध कवितेचा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २०११, पृष्ठे ८+१८०, मूल्य २२५ रुपये
६. मिशेल रिफ्फातेरी (नोव्हेंबर २०, १९२४-मे २७, २००६) हा संरचनावादी साहित्य समीक्षक होता. त्यानेच हायपोग्राम (समष्टीत मूळचीच असलेली शब्दकळा) व सिलेप्सिस (use of a word with two others, with each of which it is understood differently) या संकल्पनांची मांडणी केली. त्याचे (सेमियॉटिक्स ऑफ पोएट्री, इण्डियाना युनिव्हर्सिटी प्रेस, १९७८, १९८४ मिथ्युन यङ्ग बुक्स, १९८०,) हे या दृष्टिकोनातून अभ्यासणे आवश्यक वाटू शकते.
७. मालशे मिलिंद
अ) साहित्यप्रकारांची संकल्पना, साहित्य : अध्यापन आणि प्रकार, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९८७, (संपादन : श्री. पु. भागवत व अन्य)
आ) साहित्यप्रकाराचा अभ्यास, साहित्याचा अभ्यास, र. बा. मंचरकर गौरवग्रंथ, प्रतिमा प्रकाशन, पुणे, २००७, (संपादन : व अन्य)
८. क्लिअन्थ ब्रुक्स (ऑक्टोबर १६, १९०६-मे १०, १९९४) या अमेरिकन समीक्षकाने उच्च शैक्षणिक स्तरावरले कवितेचे अध्यापन करण्यासाठी प्रभावी मार्ग सांगितले. त्यांच्या 'अण्डरस्टॅंडिंग पोएट्री', १९३८, १९५०; होल्ट, राइनहार्ट अँण्ड विन्स्टन ऑफ कॅनडा लिमिटेड, १९६०; हाइन्ले अँण्ड हाइन्ले, १९७६. ह्या पुस्तकाने कवितेच्या आकलनासाठी आवश्यक असलेले नवीन मानदंड निश्चित केले.
९. सर विल्यम एम्पसन (सप्टेंबर २७, १९०६-एप्रिल १५, १९८४)
१०. जेम्स बॉस्वेल, ऑकिनलेकचे नववे लेअर्ड (ऑक्टोबर २९, १७४०-मे १९, १७९५)ला स्कॉटलण्डमधील ऑकिनलेकच्या प्रदेशातील नववे लेअर्ड असे अभिनाम लाभले होते. लेअर्ड ही पदवी बॅरनच्या खालची व एस्कायरच्या वरची पदवी होय. ह्या पेशाने अभिभाषक असलेल्या लेखकाने दैनंदिनी लिहिल्या. त्याने त्याला समकालीन असलेल्या डॉ. सॅम्युएल जॉन्सनचे ('लाइफ ऑफ सॅम्युएल जॉन्सन', १७९१) चरित्र लिहिले. डॉ. जॉन्सनचे विसाव्या शतकातील समीक्षक हेरॉल्ड ब्लूमने हे चरित्र इंग्रजी साहित्यातील सर्वोत्कृष्ट चरित्र असल्याचा निर्वाळा दिला आहे.

◆




## निमित्त : साहित्य अकादमी

मंदा खांडगे

**आश्वासक तरुण कवी वीरा राठोड यांना अलीकडेच साहित्य अकादमीचा 'युवा साहित्यिक पुरस्कार' जाहीर झाला आहे. या निमित्ताने राठोड यांच्या 'सेनं सायी वेस' या कवितासंग्रहाचे अंतरंग उलगडणारा लेख इथे प्रसिद्ध करीत आहोत.**

# जीवनाची जळती स्पंदने टिपणारी कविता सेनं सायी वेस

'सेनं सायी वेस' या कवितासंग्रहाचं नाव वेगळं असं आणि शब्दही अनोळखी. प्रा. वीरा राठोडांनी पुस्तक भेट पाठवलं होतं. उत्सुकतेने वाचायला घेतलं. नावात कुतूहल होतं. सेनं सायी वेस (जगाचं-सर्वांचं कल्याण कर) ही पहिलीच कविता वाचली आणि सेना सायी वेस ही बंजारा समाजाच्या तांड्यावर म्हटली जाणारी प्रार्थना आहे हे कळलं. पहिल्या पानावर एका बाजूला बंजारा बोलीभाषेतली ही पूर्ण कविता आणि शेजारी त्याचा अर्थ दिला आहे.

*गोर गरिबेन सायी वेस*
*वाडा वस्तीनं सायी वेस*
*खुटा मुंगरीन सायी वेस*
*किडी मुंगीन सायी वेस*
*बालबचिया जीव जनजातीनं सायी वेस*
*सेरीवेन मांडवान पुचोयस*
*अन् सेनं साय वेस*

**अर्थ :** गोरगरिवांचं कल्याण कर
वाड्या-वस्त्यांचं कल्याण कर
जीव-निर्जीवांचंही कल्याण कर
किड्या-मुंग्यांचंही कल्याण कर
फुला-मुलांचं कल्याण कर
जीव-जनावरांचं कल्याण कर
सर्वांची स्वप्नं फळाला येऊ दे
ध्येयाला जाऊ दे
आणि सर्वांचं कल्याण होऊ दे.

खरं तर ही आदिमकाळापासून म्हटली जात असलेली मानवी कल्याणाची प्रार्थना आहे. प्रा. राठोडांनी ही प्रार्थना अनुवादासह आपल्या कवितेच्या पुस्तकात देऊन आणि संग्रहाला तेच नाव देऊन बंजारा भाषेच्या मर्यादितून बाहेर काढून सर्वांसमोर ठेवली आहे. या कवितासंग्रहातील एकूण कवितेचं स्वरूप आशय आणि अभिव्यक्ती, त्यातले विचार पाहता हे आगळं-वेगळं नाव संग्रहाला समर्पक आहे.

संग्रह उघडून वाचायला सुरुवात केल्यावर जाणवतं, की ही कविता भटक्या-विमुक्तांच्या वेदनेचे हुंकार आहेत, तशीच

ही कविता म्हणजे वंचित समूहाच्या व्यथा-वेदनेला प्रकट करणाऱ्या प्रार्थनाही आहेत. प्रा. राठोडांनी एका मुलाखतीत 'माझ्या कवितेची वीण ही दुःखाच्या खोल गाभ्यातून उसवलेली आहे' असं म्हटलंय. कविता वाचताना ते पदोपदी जाणवतं. परभणी जिल्ह्यातल्या जिंतूर तालुक्यातील ६०-७० उबऱ्यांचा तांडा. सावळी तांडा. या तांड्यात ते लहानाचे मोठे झाले. बाप आकंठ दारूत बुडालेला. आईने मरणापलीकडचं दुःख सोसलेलं. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत शिक्षण घेऊन ते पदवीपर्यंत पोहोचले. पीएच.डी.ची पदवी संपादन केली. आता औरंगाबदला कॉलेजात प्राध्यापकी करतात. पण भटक्या-विमुक्तांच्या चळवळीत विद्यार्थिदशेपासून ते सक्रिय होते. मोर्चे, आंदोलने यात सहभागी होत होते. यातूनच या बंजारा समाजाच्या 'कार्यकर्त्या'चं आयुष्य घडत गेलं. दरम्यान, कवितेने त्यांना साथ दिली. जगण्याचा जसा अर्थ कळू लागला, जगण्यातल्या दाहकतेचे चटके जाणवू लागले, तशी मनातली अस्वस्थता शब्दरूपाने व्यक्त होऊ लागली. म्हणूनच प्रा. राठोड म्हणतात, 'कविता हे माझे विरंगुळ्याचे साधन नसून ती माझ्या जगण्याचा श्वास आहे. माझी कविता मुक्या तांड्याचा आवाज बनू पाहतेय. माझी कविता नवपरिवर्तनाची हात देतेय.' हा त्यांना विश्वास आहे.

आपल्या कवितेविषयी प्रा. राठोड म्हणतात, 'तांड्यातल्या बायाबापड्यांनी लोककवितेचे संस्कार दिले. माझ्या कवितेची बीजे अंकुरित करण्यात अनेकांचे संस्कार आहेत. त्यात माझी याडी (आई), दीदी याही आहेत. शिक्षण घेत असताना डॉ. शत्रुघ्न फड, कवी पी. विठ्ठल यांनी माझी कवित्वशक्ती जाणून प्रोत्साहन दिले.



प्रा. राठोड यांच्या कविता म्हणजे वास्तवातली दाहकता आहे. मन चक्रावून टाकणाऱ्या ज्वलंत घटनांची मालिका आहे. सल, अस्वस्थता, दाहकता या साऱ्यांचं एक अजब रसायन या कवितेत आहे. अनुभूतीची प्रांजलता आहे. त्यात एक सोसलेपण आहे. ती आतून आलेली आहे, म्हणूनच हृदयाला भिडते. 'माझ्या कवितेची नाळ दुःखभोगाच्या वाटेवरच्या हरेक माणसाशी जोडली आहे. कवितेला मी केवळ कविता मानत नाही, तर जीवनशोधाची परिक्रमा मानतो. कविता मला जगण्याचे बळ देते. जीवनासाठी प्रचंड विश्वास निर्माण करते. आईने मरणापलीकडे दुःख सोसले. तेव्हा दुःखाचे गाणे ऐकायला जवळची वाटली ती कविताच. मला कविता शोधायची ती यासाठी, की माझ्या सभोवतालचे जे दुर्लक्षित जगणे आहे, त्या जगण्याच्या व्यथा-वेदना, त्यांच्या भावभावना तिने व्यक्त कराव्यात,' असा दुर्दम्य आशावाद प्रा. राठोड व्यक्त करतात. तेव्हा त्यांच्या कवितेतील दाहक सत्याचे चटके पदोपदी जाणवतात.

*'देह पाषाणाचा केला*
*खूप भोगूनिया हाल,*
*परी पेटलीच नाही*
*कधी आम्हा दारातली चूल'*

हे भोग पूर्वापार चालत आलेले आहेत.

*'तारे पूर्वज*
*आप्त गणगोत*
*जन्मभर भटकले रानोमाळ*
*मीही भटकतोय*
*तुकड्यांसाठी'*

ही व्यथा काळजात बाळगूनही जगासाठी मागताना स्वतःला मागायचे विसरून गेलेला हा कवी

*'सेनं सायी वेस*
*सेरी वेल मांडवाला पूचायेस'*

सर्वांची मनोकामना पूर्ण करणारी प्रार्थना म्हणतो आहे.

*'मुयेन मटी अन् जिवतेन बाटी*

(ज्याचा मृत्यू झालाय, त्याला विसरून जिवंत आहे त्याच्या भाकरीची सोय करा.)

*हे जीवनाचे अंतिम विधान*
*गोंदत गेले बापजादे*
*जिभेपासून काळजावर*
*जगण्याचे शीर्षक म्हणून'*

हे सारे कवितेत मांडण्यासाठी या कवीला ऊर्जा कुठून मिळाली? 'याडी' (आई) या कवितेत हा कवी म्हणतो-

*'याडी झाली उजाडण्याआधी*
*पोरिया तारा'* (सकाळी सूर्य उगवण्याआधी निघणारी चांदणी)
*नि उजळून काढला*
*घरात साचलेला अंधार*

*याडी तू विणलास खोपा*
*काडीकाडीचा*
*अन् उराशी बांधीत गेलीस स्वप्न*
*चिरेबंदी माडीचं*
*'वीरारे सोनो पितळ तारो देस रे*

*वीरारे धोळिसी हवेलीमं रेस रे'*

(बंजारा स्त्रियांचे लोकगीत, जे वर्तमानातून जगताना भूतकाळाच्या वैभवसंपन्नतेचा इतिहास सांगते व भविष्यात वाटचाल करताना प्रेरणा देते, सन्मानाने जगण्यासाठी आशावाद निर्माण करते.)

*'तुझी ही काळीज कापणारी बोली*
*जीव घ्यायला धावते*
*मरू देत नाही*
*जगायला धावते'*

या जिद्दी आईने

*'याडीनं खडक झिजवला*
*जन्मभर गोड केलं*
*कष्टाचे फोड*
*पण संसारात कधीच*
*येऊ दिली नाही खोट'*

यातना सोसण्याचं, त्यातून मार्ग काढण्याचं बळ आईकडूनच मिळालेलं. या आईचा घरोबा दुःखाशी आहे. दुःखाची बारव (विहीर) साचली तरी कित्येक रात्री जागवून तिने कधी दिवा विझू दिला नाही. दुःखाला सावली देण्याची भाषा ती कुठे शिकली? दारोदार हिंडत पाठीवर संसार घेऊन जाणारा तांडा, उद्याच्या आशेवर परिक्रमा करणारा- दुःख आतल्या आत गिळत.

*'मी जळतोय आतल्या आत*
*कापसाच्या गंजीसारखा'*

असं दुःख व्यक्त करताना ही वेदना इतकी तीव्र आहे ती या उपमेवाटे मुखर झाली आहे.

साऱ्या देहाला भिरूड (झाड पोखरणारा किडा) लागलंय आणि समान व्यवस्थेच्या वाळवीने पोखरून काढलंय. त्यामुळे

*हे जगणं ही कविता*
*त्याचीच तर आहेत रेखाटनं*
*तरीही हे सारं सोसत जगण्याची आस आहेच*
*आपली कर्मकहाणी जात्यात ओतली*
*भरडून काढलं दुःखाला*
*सांज-सकाळी*
*हेच पीठ खात जगलोय वाढलोय आम्ही*
*लोखंडाचे चणे पचवण्याची ताकद या पिठाने नक्कीच दिली.*

या दुःखभोगाच्या कवितेखेरीज काही व्यक्तींची शब्दचित्रंही मनाचा वेध घेतात. परिवर्तनाच्या विचारांच्या वाटेशी आजन्म बांधील राहिलेला तांड्याचा वीर आत्माराम राठोड, तळातल्या माणसांचा दूत असलेला मोठा भाऊ वसंत



सेनं सायी वेस
वीरा राठोड
गोदा प्रकाशन

विरेणा, स्वातंत्र्याच्या क्रांतिकुंड उमाजी नाईक इतिहासाच्या ठेकेदारांनी त्याला दरोडेखोर ठरवल्याची खंत व्यक्त करत कवी म्हणतो, 'तू पाहिलेस भारतीय स्वातंत्र्याचे पहिले स्वप्न, मात्र फितुर झालेल्यांनी बेइमानी केली. आत देश या क्रांतिवीराला विसरला याचे दुःख मनात आहे.

फुलन दरोडेखोर झाली; पण दरोडेखोर म्हणून तिची निर्भर्त्सनाच झाली. पण कवी म्हणतो-

*तू भोगाचा भोगकुंड झालीस*
*तरीही*
*कोणताच खाकीतला भडवा*
*वाचवू शकला नाही*
*बाया-पोरींचा चोळी-चुडा*
*आजही*
*फुलन अशी का झाली?*
*बिहामीच्या भोगसुरांनी*
*तोडला तुझा एकेक लचका*
*खिळखिळा केला*
*तुझ्या मनसुब्याचा मणका*
*तरीही तू चंग बांधलास*
*आत्मशोधाचा, प्रतिशोधाचा*

म्हणूनच या मल्लावच्या (भटक्या जमातींपैकी एक जमात मल्लाह) पोरीला, तिच्या प्रतिशोधाला सलाम!

स्वातंत्र्य मिळालं, पण सेटलमेंटच्या तारेचे आवळलेले कुंपण आणि नासवले गेलेले माणूसपण, ही भळभळती जखम न भरणारी-

*चोर-गुन्हेगार जमातीचा पाठ*
*कायद्याच्या पुस्तकात*
*अजूनही जिवंत आहे हे दाहक सत्य*
*हे सांगताना मनाला होणाऱ्या यातना*
*हे कसलं स्वातंत्र्य?*

असा सवाल कवी करतो.

तांड्यावरच्या तमाम स्त्रीजातीचं दुःखही त्यांच्या कवितांतून मूकपणे पाझरत राहतं.

'वाघऱ्याची छबी अजून धंद्याला जाते' या कवितेतील छबीची कर्मकहाणी मन हेलावून टाकणारी आहे.

आजही समाजात ज्या कुप्रथा आहेत आणि त्यामुळे स्त्रीला भोगाव्या लागणाऱ्या नरकयातना वर्णन करताना कवी म्हणतो-

*चिरा म्हणजे*
*पहिला भोग*

*अन् जिंदगीचा रोग*

(चिरा- नुकत्याच वयात आलेल्या मुलीचा बोली लावून करण्यात येणारा पहिला संभोग) चिऱ्याच्या नावाखाली धंद्यावर वसवल्या गेलेल्या वयात आलेल्या स्त्रीचं हे दाहक दुःख सांगताना कवीने समाजवास्तवावर कोरडे ओढले आहेत.

'भळभळत्या क्रुसाची वेदना' या कवितेत कवी म्हणतो-

*'पण ही परंपरेची चौकट*
*पदर सोडत नाही*
*काय माहीत*
*अजून किती पिढ्या*
*नाचत राहणार*
*भुतासारख्या छाताडावर*

हे सगळं वास्तव असलं तरी दुर्दम्य इच्छाशक्ती आणि आशावाद जवळ आहे. म्हणूनच तो म्हणतो,

*पांथस्थांनो*
*चालू लागा मशाली घेऊन*
*हाकारणाऱ्या मुक्कामाकडे*
*अंधाराच्या गावागावांतून*
*उजेडाचे बेट उभे करीत*
*जायचे आहे.*

आणि कवी हेही सांगतो, की

*मी भाकरीचा शोध घेतो*
*तू गाणे विणत राहा*
*भाकरी ही गाण्याइतकी नसते सोपी*
*जी मनात येईल तेव्हा*
*पकडता येईल सुरासारखी*
*पण गाणंही मोठंच असतं भाकरीपेक्षा*

सनातन भुकेचा संघर्ष असा शब्दरूप घेऊन येतो. हा संघर्ष असा जगण्याचा आहे, भाकरीचा आहे, भुकेचा आहे. या साऱ्यासाठी

*चार ठेचा खाव्याच लागतात*
*चालायचं म्हटल्यावर*
*असं आहेच काय*
*तुझ्या-माझ्याजवळ*
*जे घेऊन जाईल मुक्काम करून तो*
*हो, तुझा विश्वास तेवढा*
*उशाला राहू दे*

या विश्वासावर भटक्या-विमुक्तांचा आवाज आपली कविता बनेल, असा दृढ विश्वास या कवीला आहे. 'सेनं सायी वेस' असं म्हणणाऱ्या या कवीला त्याच्या या प्रांजळ कवितेबद्दल या वर्षीचा तरुणाईला देण्यात येणारा 'साहित्य अकादमी'चा पुरस्कार जाहीर झाला आहे त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन आणि पुढील काव्यप्रवासास शुभेच्छा!

◆

**डॉ. मंदा खांडगे**
चलभाष : ९३२६८४२२०५



विशेष लेख

शीला निपुणे

■■

**आषाढ शुद्ध त्रयोदशी ही संत नामदेवांची पुण्यतिथी. त्यानिमित्त संत नामदेवांच्या नामभक्तीचा हा थोडक्यात घेतलेला वेध.**

■■

संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांच्या प्रभावळीतील संतमंडळींमध्ये भक्तश्रेष्ठ म्हणून गणले गेले ते संत नामदेव. ते श्रेष्ठ भक्त म्हणविले गेले ते त्यांच्या अव्याज, निखळ अशा विठ्ठलभक्तीमुळे हे जसे खरे, तसेच हेही खरे, की नामदेवांच्या सगुण भक्तीला विसोबा खेचर यांच्यासारख्या गुरूकडून आत्मज्ञानाचा डोळा लाभला आणि सगुणाकडून निर्गुणाकडे झालेल्या या प्रवासाने नामदेवांना परमपद प्राप्त झाले.

नामदेवांचे घराणे विठ्ठलभक्तांचे. मराठवाड्यातील 'नरसी बामणी' हे त्यांचे मूळ गाव. येथून जवळच 'औंढ्या नागनाथ' हे पाशुपतींच्या उपासनेचे प्राचीन मंदिर आहे. तेथील परम शिवभक्त दामाशेटी आणि त्यांची पत्नी गोणाई हे दांपत्य विठ्ठलाचेही उपासक आणि पंढरीचे वारीकर होते. त्यांनी विठ्ठलाला केलेल्या नवसाने झालेले पुत्ररत्न म्हणजे नामदेव. नामदेवांचा जन्म शके ११९२ म्हणजे इ. स. १२७० मध्ये झाला.

दामाशेटी यांचा कापडाचा व्यवसाय होता; पण नामदेवांना त्यात रस नव्हता. लहानपणापासूनच त्यांना विठ्ठलभक्तीची गोडी लागलेली होती. गोविंदराव सदावर्ते यांची आठ वर्षांची मुलगी राजाई हिच्याशी त्यांचा विवाह झाला; पण प्रपंचात त्यांचे मन लागेना. त्यातच संसाराच्या आणि व्यवसायाच्या व्याप-तापांनी ते पोळून निघाले, तेव्हा त्यांनी विठ्ठलाचा काकुळतीने धावा केला-

*पुत्र कलत्र बंधु सांगाती देहाचें ।*
*बांधलें मोहाचें । वज्रपाशीं ।।*
*तिहीं माझें चित्त केलें तडातोडी ।*
*नाहीं एक घडी । सुखलेश ।।*
*दुःखाचें डोंगर पडिलें मजवरी।*
*धांव या श्रीहरी । पांडुरंगा ।।*

भवतापाने गांजलेल्या नामदेवांचे चित्त पांडुरंगाकडे अधिकच ओढले गेले. त्याच



# सांपडलें नाम नामयासी।

वेळी संत ज्ञानदेवांच्या आदेशावरून ते औंढ्या नागनाथ येथे विसोबा खेचर यांच्याकडे अनुग्रह घेण्यास गेले. गुरूपदेशाने नामदेवांचा कायापालट झाला. त्यांचा देहभाव हरपला. अहंकार निमाला. यातूनच आत्मनिरीक्षण आणि आत्मपरीक्षण घडले. ही अनुभूती शब्दबद्ध करताना नामदेवांनी म्हटले-

*सद्‌गुरु नायकें पूर्ण कृपा केली ।*
*निजवस्तु दाविली माझी मज ।।*
*माझें सुख मज दावियलें डोळां ।*
*दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ।।*

आपल्याला लाभलेल्या दिव्य अशा अनुभूतीबद्दल गुरू विसोबा खेचर यांच्याविषयीचे अपार ऋण नामदेवांनी वेळोवेळी व्यक्त केले आहे. गुरुकृपेमुळे घडलेल्या आत्मपरीक्षणामुळे त्यांची नामसाधना अधिक सजगतेने, डोळसपणे सुरू राहिली. स्वतःच्या मर्यादांची नव्याने जाण आली आणि-

*'अमृताहुनि गोड नाम तुझें देवा ।*
*मन माझें केशवा कां बा नेघें ।।*

असे विठ्ठलाला व्याकूळ होऊन विचारणाऱ्या नामदेवांची अंतःशुद्धी होत राहिली. मनाचा गाभारा परमात्मप्राप्तीने भरून गेला, परमज्ञानाच्या दीप्तीने ओसंडून गेला, अधिकाधिक उजळत राहिला, आणि त्यातूनच विश्वरूप परमात्म्याशी झालेले विलक्षण एकरूपत्व नामदेवांनी अनुभवले. या आत्मानुभूतीने त्यांची भक्तिभावनाच विश्वरूप झाली. सर्वत्र आत्मचैतन्य विस्तारत गेल्याचा अनुभव त्यांना आला, तेव्हा नामदेवांची भक्ती सगुण विठ्ठलापुरती सीमित राहिली नाही. 'तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल' असे म्हणताना नामदेवांना 'विठ्ठल सापडला' याच आत्मप्रचितीतून-

*दीनानाथ ऐसें नाम बहुतांसि वाटिलें।*
*निर्गुण तें उरलें तुजपाशीं ।।*

असा प्रगल्भ आत्मसंवाद ते विठ्ठलाशी साधतात. याच नामाची सांगड बांधून वैकुंठप्राप्तीची आस विठ्ठलाकडे प्रकट करतात-

*नामाची सांगडी देऊनियां मातें ।*
*वैकुंठावरुतें नेऊनि घाली ।।*

नामदेवांच्या रचनांमधील आर्जव, लाघव आणि आर्त मनाचा तळ ढवळून बाहेर येते, तेव्हा तहान-भूक आदी दैहिक व्यापारही निवून जातात-

*तान्हेलों भुकेलों । तुझेंनि नामें निमालों ।*
*तहान नेणें भूक नेणें । अखंड पारणें नामीं तुझ्या ।।*

अशी ही अवस्था!

हठयोगांच्या कठोर योगसाधनेचे वर्णन करताना संत ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे-

*'भुकेलिया भूकचि खावी। तहानेलिया तहानचि पियावी।।'*

हा अतिशय कठीण असा योग नामदेव नामभक्तीतून किती लीलया साधतात!

विठ्ठलनामापुढे कळिकाळाचाही पाड लागत नाही, ही दृढ श्रद्धा नामदेवांनी अवघ्या जनांपर्यंत पोहोचवली.

*नामें तारूं अवघे जन । यमपुरीं घालूं वाण ।।*
*करूं हरिनामकीर्तन । तोडूं देहाचें बंधन ।।*

असे जनसामान्यांना कळकळीचे आवाहन करणाऱ्या नामदेवांनी महाराष्ट्रासह उत्तरेत, पंजाबपर्यंत नामभक्तीची ध्वजा फडकावली. शीख बांधवांच्या 'गुरुग्रंथसाहेब' या पवित्र धर्मग्रंथात समाविष्ट असलेली नामदेवांची एकसष्ट पदे याच भक्तिभावाने ओथंबलेली आहेत.

*मन मेरे गजु जिव्हा मेरी काती ।*
*मपि मपि काटऊ जमकी फाँसी ।।*

या पदात नामदेव महाराजांनी म्हटले आहे- 'माझे मन म्हणजे कापड मोजण्याचा गज (तीन फुटी मापदंड) आहे आणि माझी जीभ म्हणजे कात्री आहे. मनापासून जिव्हेने नामस्मरण करताना मी यमाचे पाश कापून टाकीन.' सहजसुंदर रूपकात्मकतेने नामदेवांनी या पदातून नामस्मरणाचे महत्त्व लोकमानसावर बिंबवले आहे. ते पुढे म्हणतात -

*कहाँ करूं [illegible] करूं पाती ।*
*रामका नाम जपो दिन और राती ।।*

'जाती-पातीचे भेद आम्हास ठाऊकच नाहीत. रात्रंदिवस रामनामाचा जप करणे- बस्स! हेच फक्त आम्हास ठावे!

*सोनेकी सुई रुपेका धागा ।*
*नामाका चित्त हरसू लागा ।।*

हरीशी तद्रूप झालेल्या नामदेवांची सुई मग सोन्याची होऊन जाते आणि धागा चांदीचा होतो. अवघा व्यवसाय, अवघे चित्त हरिरूप होऊन जाते.

एका मराठी रचनेतही हीच आशयसुंदरता नामदेवांनी साधली आहे. आपले जीवनवस्त्रच पांडुरंगापायी अर्पण करणारे नामदेव येथे म्हणतात -

*'शिंपियाचें कुळीं जन्म मज जाला ।*
*परि हेतु गुंतला सदाशिवीं ।।*
*सुई आणि सुतळी कात्री गज दोरा ।*
*मांडिला पसारा सदाशिवीं ।।*
*दिसामाजि शिवी रात्रीमाजि शिवी ।*

*आराणूक जीवीं नाहीं माझ्या ।।*
*नामा म्हणें शिवी विठोबाची अंगी ।*
*तेणेंच मी जगीं धन्य जालों ।।*

नामदेवांनी आयुष्यभराची धन्यता अनुभवली अशी- आपले कर्तव्यकर्म ईश्वरार्पणवृत्तीने करूनच..! भगवद्गीतेतील निष्काम कर्मयोगाचा वस्तुपाठ या संतमंडळींनी जनसामान्यांना सहजी घालून दिला.

नामदेवांच्या रचनेत कोणतीही क्लिष्टता नाही, कसलाही अभिनिवेश नाही. त्यांच्या प्रत्येक काव्यकृतीतून झरते आहे ती अंतरंगातील निर्मल भक्तिभावनेची हृदयंगम आविष्कृती. त्यांची अभिव्यक्ती म्हणजे उत्कृष्ट भावकविताच आहे. भावकाव्यातील भावनांची कोमलता, हृद्यता नामदेवांच्या लेखणीला स्वभावतःच लाभलेली आहे. त्यांच्या अंतःकरणातील भावनांची कोवळीक उत्स्फूर्तपणे शब्दरूप घेते आणि हृदयाचा ठाव घेत जाते.

नामदेवांचा आणि त्यांच्या कवित्वाचा यथोचित गौरव करताना संत ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे -

*भक्त भागवत बहुसाल ऐकिलें ।*
*बहु होऊनि गेलें होती बहु ।*
*परि नामयाचें बोलणें हे नव्हें कवित्व ।*
*हा रस अद्‌भुत अनुपम्यु ।।...*

अपन्हुती अलंकारातून ज्ञानदेवांनी केलेली नामदेवांची ही प्रशस्ती नामदेवांच्या श्रेष्ठत्वाची साक्ष देण्यास पुरेशी आहे. नामदेवांच्या काव्यातील हा अद्‌भुत आणि अनुपम रस ही त्यांच्याकडून भक्तिसंप्रदायाला मिळालेली फार मौलिक अशी देणगी आहे. आपल्या काव्यातून ज्या उत्कटतेने, आर्ततेने आणि समरसून त्यांनी 'ह्या हृदयींचे त्या हृदयीं घातलें' त्याला खरोखरच तोड नाही! त्यांच्या शब्दांमधील आर्तता इतकी पराकोटीची आहे, की त्यातून विठ्ठलनामाचा अक्षरशः टाहो फुटला आहे-

*विठ्ठलनामाचा रे टाहो ।*
*तुटला संदेहो । भवमूळव्याधीचा ।।*

ही आर्त साद नामदेवांच्या नामभक्तीची गहिरी मुद्रा उमटवून जाणारी आहे. या नामाच्या जोरावरच भवसागरातून पैलथडी जायचे आहे.

*म्हणा नरहरी उच्चार । कृष्ण हरी श्रीधर ।*
*हेंचि आम्हां सार । संसार तरावया ।।*

हा अभंग विश्वास त्यांच्या ठायी आहे. यापुढेही जाऊन ब्रह्मप्राप्तीचे साधनही 'नाम' हेच आहे, असे नामदेव सांगतात-

*'आतां गाईन मी गुणकीर्ति ।*
*जेणें चारी मुक्ती दासी होती।*
*साधक लोकांसी हेचि पैं साधन।*
*ब्रह्म सनातन वश होय।।'*

योगी जनांना योग-याग-तपःसाधनेतूनही जे अप्राप्य ठरते, ते सनातन ब्रह्मतत्त्व आम्हाला नामसंकीर्तनातून प्राप्त होते, अशी त्यांची मनोधारणा आहे.

यामुळेच 'नामेंविण कांहीं आम्हांपाशी नाहीं।' असे सांगताना -

'विचारोनि पाही पांडुरंगा ।।' अशी पांडुरंगाची साक्ष ते काढतात. त्याच वेळी विठ्ठलालाही ते शरणागततेने सांगून जातात, की -

*'मज पाळिसी तैसें पाळी दीनानाथा ।*
*न सोडी सर्वथा नाम तुझें ।।*

कारण या नामामृतातून मिळालेले सुख हे परमानंदाची प्रचिती देणारे आहे.

*माझें मज कळलें । माझें मज कळलें ।*
*माझें मज कळलें । प्रेमसुख ।।*

हे त्रिवार सत्य नामदेवांच्या अंतहृदयातून उमटत राहते, निनादत राहते. ईश्वराशी ही विलक्षण एकरूपता, ही अलौकिक आत्मशक्ती नामदेवांना मिळाली ती त्यांच्या आत्मबोधातून.

*'खेचरू विसा प्रेमाचा पिसा ।*
*तेणें नामा कैसा उपदेशिला ।।*

हे गुरुऋण नामदेवांच्या मनात कायम जागे आहे. कारण

*श्रवणीं सांगितली मात । मस्तकीं ठेविला हात ।*
*पदपिंडविवर्जित । केला नामा ।।*

असे त्यांनी म्हटले आहे.

विसोबा खेचर यांनी नामदेवांना जीव आणि शिव यांच्यातील ऐक्याची अनुभूती दिली. 'तत्त्वमसि' या महावाक्यातून 'तू म्हणजे तेच (परब्रह्म) आहेस' हा बोध त्यांनी नामदेवांना केला. ही मात, हे समत्व, ही खूण त्यांनी नामदेवांना पटविली आणि नामा 'पदपिंडविवर्जित' झाला!

ज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायात श्रीकृष्णाने अर्जुनाला कसा बोध केला याचे वर्णन करताना ज्ञानदेव म्हणतात-

*जे गुरुशिष्यांची गोठी। पदपिंडाची गाठी ।*
*तेच स्थिर होऊनि नुठी । कवणें काळीं ।।*

अर्जुनाला कर्मयोग समजावून देताना येथे भगवंत म्हणतात- 'हे अर्जुना, गुरुशिष्याच्या संवादातील विचारांमधून प्राप्त झालेली परमात्म्याची जी एकरूपता आहे तिच्या ठायीच तू स्थिर होऊन राहा. तेथून कधीही हलू नकोस.'

ही 'पदपिंडाची गाठी' नामदेवांनी गुरू विसोबा खेचर यांच्या अनुग्रहातून अनुभवली. 'पदपिंडविवर्जित केला नामा' अशा नेमक्या शब्दांमधून परमार्थातील हे गूढ असे अंतिम

सत्य नामदेवांनी येथे किती ताकदीने मांडले आहे!

नामदेवांच्या सरल, प्रांजल, प्रासादिक आणि आर्त काव्यातून परमार्थातील गहन तत्त्वे अशी सहजतेने प्रत्ययाला येतात. वाणीचे, लेखणीचे हे सामर्थ्य नामदेवांच्या हृदयस्थ विठ्ठलाने त्यांना दिले, की ज्ञानदेवांसारख्या महान योग्याच्या सहवासातून, प्रेमजिव्हाळ्यातून त्यांना ते लाभले, की विसोबांसारख्या सिद्ध पुरुषाच्या उपदेशाने हा अपार्थिवाचा अमृतस्पर्श त्यांच्या जीवनाला झाला, याचा विचार करताना असे जाणवते, की नामदेवांच्या या साऱ्याच संचिताने हे दान त्यांच्या ओंजळीत टाकले.

नामदेवांचा मूळचा पिंड सात्त्विक. त्यात मातापित्यांकडून जन्मतःच लाभलेला विठ्ठलभक्तीचा वारसा. सतत संतांची संगती, वारकरी पंथावरोबरच नाथसंप्रदायातील तत्त्वज्ञानाचे मिळालेले पाथेय यातून त्यांच्या अंतःकरणात अद्वैताची ज्योती उजळली आणि अखंड आत्मतेजाने ती तेवतच राहिली. त्याच वेळी विठ्ठलाच्या मस्तकावरील शिवलिंगाचे रहस्य नामदेवांना उमगले. विठ्ठल हे हरिहरैक्याचे प्रतीक असल्याची ग्वाही पटली आणि मनोमनी - 'मीच माझा देव । मीच माझा भक्त।।' अशी खूणगाठ पक्की झाली. ही परमावधीची एकरूपता अनुभवताना नामदेव म्हणतात-

*तूं आवकाश मी भूमिका । तूं लिंग मी साळुंका ।*
*तूं समुद्र मी द्वारका । स्वयें दोन्ही ।।*
*तूं वृंदावन मी चिरी । तूं तुळस मी मंजिरी ।*
*तूं पावा मी मोहरी । स्वयें दोन्ही ।।*
...
*नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझिया प्रेमा ।*
*मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ।।*

नश्वर देहातील अजर, अमर आत्मचैतन्याची जागृती अनुभवताना नामदेवांच्या वृत्ती विश्वचैतन्याशी एकत्व पावल्या. हा अद्वैताचा साक्षात्कार त्यांच्या प्रसन्न काव्यशैलीचा स्थायीभाव ठरला. त्यामुळेच आपली भोळ्या भक्तीची पूर्वस्थिती आणि गुरुबोधानंतरची साक्षात्कारी अवस्था या दोन्हींची जाण नामदेव एकाच वेळी व्यक्त करू शकतात आणि हृदयात घट्ट धरून ठेवलेल्या विठ्ठलाला अतूट प्रेमाधिकाराने बजावतात-

*आम्हांपासूनिया जातां न ये तुज ।*
*तें हें वर्म बीज नाम घोकूं ।*
*भोळीं भक्तें आम्ही चुकलों होतों वर्म ।*
*सांपडलें नाम नामयासि ।।*

◆

प्रा. शीला निपुणगे
चलभाष : ९८९०३५४३६२

---










# स्त्रीलिखित मराठी कथेचा सर्वांगीण वेध

'स्त्रीलिखित मराठी कथा' हा डॉ. अरुणा ढेरे यांनी संपादित केलेला ग्रंथ पद्मगंधा प्रकाशनाने नुकताच प्रकाशित केलाय. भारती विद्यापीठ विश्व विद्यालयाच्या 'शाश्वती' स्त्री सर्जनशक्ती विकास केंद्राने केलेल्या प्रकल्पातील हा दुसरा प्रकाशित खंड आहे. या प्रकल्पात स्त्रीलिखित कादंबरी, कथा व कविता या खंडांचा समावेश आहे. त्यापैकी स्त्रीलिखित कादंबरी हा खंड यापूर्वीच प्रकाशित झाला आहे.

'स्त्रीलिखित कथा' या खंडामध्ये १९५० ते २०१० या कालखंडातील महत्त्वाच्या कथालेखिकांशी संवाद आणि त्यांच्या प्रातिनिधिक एकेक कथेचा समावेश केलेला आहे.

१९५०-२०१० हा कालखंड आपल्या देशाच्या, समाजाच्या इतिहासातला एक अत्यंत महत्त्वाचा आणि घटनांनी परिपूर्ण असा काळ आहे. हा संपूर्ण कालखंड भारतातील स्वातंत्र्योत्तर परिस्थितीत राज्यघटनेचा स्वीकार, १९६० नंतरच्या विविध सामाजिक चळवळींचा प्रभाव आणि १९९० नंतरचा जागतिकीकरणाच्या रेट्याने वेगाने बदलत चाललेला भोवताल, अशा अनेक राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, वैश्विक घटनांनी गजबजलेला कालखंड आहे. स्वातंत्र्योत्तर काळात १९५० साली आपण राज्यघटनेचा स्वीकार करून स्वातंत्र्य, समता, बंधुता या लोकशाही मूल्यांचा स्वीकार केला. साठोत्तरी काळात स्त्रिया, दलित, कामगार, आदिवासी, ग्रामीण चळवळींनी महाराष्ट्रातलं वातावरण भारलेलं होतं. या सामाजिक चळवळींच्या हातात हात घालून स्त्री, दलित, कामगार, आदिवासी, ग्रामीण साहित्याची चळवळही जोमाने निर्माण झाली होती. विशेषतः स्त्रीमुक्ती चळवळीचा प्रभाव इतका होता, की महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यापर्यंत स्त्रीमुक्तीचा विचार किमान जाणिवेच्या पातळीवर तरी पोहोचलाच होता. त्यातून प्रेरणा घेऊन महाराष्ट्राच्या विविध भागांतून स्त्रिया लेखन करू लागल्या होत्या. त्यात कविता मोठ्या प्रमाणात लिहिली गेली असली, तरी अनेकजणींनी कथा लिहूनही स्वतःच्या भावभावना, विचार-वेदनांना मोकळी वाट करून द्यायला सुरुवात केली होती. साहजिकच या कालखंडातील लिहिणाऱ्या स्त्रियांच्या लेखनाची दखल काही प्रमाणात तरी घेतली गेली. या सगळ्या पार्श्वभूमीवर स्त्रीलेखनाचा लेखाजोखा मांडणं ही एक वाङ्मयीन महत्त्वाची घटना 'स्त्रीलिखित मराठी कथा' या ग्रंथानिमित्ताने घडून आली आहे असे म्हणायला पाहिजे.

मराठीच्या कथाविश्वात जरी अनेक स्त्रियांची उपस्थिती असली तरी त्यातील निवडक अकरा लेखिकांचा विचार इथे करण्यात आला आहे. त्यात कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, रोहिणी कुलकर्णी, आशा बगे, गौरी देशपांडे, ऊर्मिला पवार, सानिया, मेघना पेठे, प्रतिमा जोशी, नीरजा आणि मोनिका गजेंद्रगडकर या गेल्या तीन पिढ्यांमधल्या, मराठी कथेवर स्वतःची छाप सोडणाऱ्या लेखिका आहेत.

या ग्रंथामध्ये या अकराही लेखिकांची प्रत्येकी एक प्रातिनिधिक कथा तर वाचायला मिळतेच, परंतु त्याचबरोबर या सर्व लेखिकांशी घडवून आणलेला संवादही आहे. अरुणा ढेरे यांनी या मुलाखतींसाठी प्रश्नांचा एक सैलसर आराखडा तयार केला होता. या साऱ्याचजणींना विचारण्याचे साधारणपणे काही समान प्रश्न आणि त्यापलीकडे त्या त्या लेखिकेच्या पिंडानुसार, तिला अधिक समजून घेण्यासाठी केलेला मोकळा संवाद, हा या ग्रंथाचा मौलिक भाग आहे. त्यातून लेखिकांची कौटुंबिक पार्श्वभूमी, जडणघडण, लेखनाच्या प्रेरणा, लेखन करण्याची निकड, विषयनिवडीची आणि एकूण लेखनाची प्रक्रिया, भोवतालातील प्रश्न आणि त्याविषयीच्या त्यांच्या भूमिका, प्रतिक्रिया, वाङ्मयीन परंपरा आणि समकालीन मराठी व इतर भाषिक कथा याविषयीच्या प्रतिक्रिया आणि एकूणच जीवनदृष्टी या मुद्द्यांना धरून लेखिकांचा विचारप्रवाह उलगडला जावा या उद्देशाने या मुलाखती घेतल्या गेल्या आहेत. मंगला आठलेकर, मीना वैशंपायन, प्रिया जामकर, अरुणा दुभाषी, वंदना बोकील-





**१९५०-२०१० या कालखंडातील स्त्रीलिखित मराठी कथांचा लेखाजोखा मांडणारा 'स्त्रीलिखित मराठी कथा' हा ज्येष्ठ कवयित्री डॉ. अरुणा ढेरे यांनी संपादित केलेला ग्रंथ अलीकडेच पद्मगंधा प्रकाशनाच्या वतीने प्रकाशित करण्यात आला आहे. या ग्रंथाचा व्यापक पट उलगडणारा लेख.**

कुलकर्णी, नीरजा इ. अभ्यासकांनी लेखिकांशी संवाद साधले आहेत. ते करताना लेखिकेच्या विचारविश्वाचा जास्तीत जास्त पट पुढे आणण्याचा प्रयत्न यातील प्रत्येकीने केलेला दिसतो. कथालेखिका आणि संवादक यांच्यातली मनःपूर्वकता आणि कसोशी, वृत्तिगांभीर्य या संवादातून जाणवल्याशिवाय राहत नाही. विशेषतः ज्या कथालेखिकेशी संवाद साधायचा आहे त्या लेखिकेच्या कथालेखनाची वैशिष्ट्ये, तिचे मर्म, तिचे आस्थाविषय आणि विचारांची दिशा लक्षात घेऊन विचारलेल्या प्रश्नांमुळे लेखिका मोकळेपणाने बोलण्यास उद्युक्त झाल्याचे जाणवते.

या अकरा लेखिका वेगवेगळ्या कालखंडांतील आहेतच; परंतु वेगवेगळ्या प्रदेशांतून, वेगवेगळ्या कौटुंबिक पार्श्वभूमींतून आलेल्या आणि वेगवेगळ्या धाटणीच्या कथा लिहिणाऱ्या आहेत. त्यांना भावणारे कथाविषय, त्यांच्या भूमिका, त्यांचा भोवताल, त्यांच्या प्रतिक्रिया, त्यांची दृष्टी, त्यांची शैली हे सगळे एकदुसरीसारखे नाही. उदा. यामध्ये निखळ स्त्रीवादी म्हणता येतील अशा विजया राजाध्यक्ष, प्रतिमा जोशी आणि नीरजा अशा तीन लेखिका असल्या तरी त्यांच्या दृष्टिकोनांत फरक आहेच.

मुख्य म्हणजे वेगवेगळ्या समीक्षकांनी या स्त्रियांवर समीक्षालेख न लिहिता त्यांनाच स्वतःविषयी, स्वतःच्या लेखनाविषयी, निर्मितिप्रक्रियेविषयी, बलस्थाने आणि मर्यादांविषयी बोलते केले आहे, हे महत्त्वाचे आहे. या मुलाखतींमध्ये कित्येक वेळा त्यांचे प्रांजळ प्रकटन हे प्रकट चिंतनाच्या पातळीवर गेलेले आहे. हा आत्मसंवाद करण्याचा अवकाश संवादाच्या निमित्ताने निर्माण केला आहे, हे या खंडाचे वैशिष्ट्य आहे. अर्थात, या सर्वच लेखिकांच्या अशा मुलाखती अन्य ठिकाणीही मौखिक वा लिखित स्वरूपात आल्या आहेत, तरीही महत्त्वाच्या अनेक लेखिकांचे असे एकत्रितं आत्मप्रकटन वाचायला मिळणे असा प्रयोग दुर्मिळ आहे,

त्याचबरोबर संजय आर्वीकर यांनी लिहिलेली प्रदीर्घ प्रस्तावना हादेखील या ग्रंथाचा एक महत्त्वाचा भाग आहे. अकरा लेखिका आणि एकूणच या मोठ्या कालखंडातील कथालेखिकांचे योगदान, त्यांच्या कथांची मूल्यमापनात्मक समीक्षा संजय आर्वीकर यांनी केली आहे. कमल देसाई यांच्या लेखनाचा त्यांचा विशेष अभ्यास आहे; परंतु इतर लेखिकांच्या लेखनाचाही तोलमोल त्यांनी वस्तुनिष्ठपणे, अभ्यासपूर्ण पद्धतीने केला आहे.

अशा तऱ्हेने प्रातिनिधिक कथा, लेखिकांशी संवाद आणि आर्वीकरांची प्रस्तावना अशा त्रिमितींनी हा खंड परिपूर्ण झाला आहे. या तीन मितींना एकत्र एका संकल्पनासूत्रात बांधण्याचे काम संपादक या नात्याने अरुणा ढेरे यांनी केले आहे. किंबहुना अशा पद्धतीने ग्रंथाची मांडणी करणे ही संकल्पना सुयोग्य आहे. त्यामुळे स्वातंत्र्योत्तर कालखंडातील स्त्रीकथांचा समग्र अभ्यास अभ्यासकांच्या समोर आला आहे.

दीर्घ प्रस्तावनेत संजय आर्वीकरांनी प्रत्येक लेखिकेच्या कथालेखनाची वैशिष्ट्ये नेमकेपणाने टिपली आहेत. विशेष म्हणजे कथालेखनाचे विशिष्ट मापदंड न लावता त्यांनी प्रत्येकीच्या कथांमधून काय मिळते आहे, काय पुढे येते आहे, लेखिका काय आणि कसे मांडू बघते आहे याचा विचार केला आहे.

या खंडामध्ये कमल देसाई यांची 'श्राद्ध' ही कथा समाविष्ट आहे. त्यातील सुब्बी बंडखोर तर आहेच. इथल्या धर्मविषयक रूढ कल्पनांना ती सुरुंग लावते, प्रश्न विचारते आणि स्वतः मूल्यनिर्णयही करते. ती वेगळ्या विचारांना धाडसीपणाने सामोरी जाऊन नव्या पर्यायांचे दिशादर्शनही करते.

स्वतःच्या लेखनाविषयी कमल देसाईंनी मुलाखतीत म्हटलं आहे, की 'मला काय करायचंय, तर बाहेरचं विश्व आणि माझं विश्व यातला संघर्ष व्यक्त करायचा आहे. माझं मानसिक विश्व मोठ्ठं आहे, तसंच बाहेरचं मानसिक विश्वही

मोठ्ठं आहे. त्या मानसिक विश्वात माझं स्थान काय आहे, हा प्रश्न जेव्हा पडतो तेव्हा तो अतिभौतिक प्रश्न होतो.' कमल देसाईंनी या प्रश्नातली गुंतागुंतच आपल्या कथांमधून मांडलेली आहे.

विजया राजाध्यक्ष गेली साठ वर्षं कथा लिहितायत. विजया राजाध्यक्ष यांची 'संधिकाल' ही कथा या खंडात समाविष्ट आहे. विजया राजाध्यक्षांचे लेखन त्यांच्या काळात नावीन्यपूर्ण होतेच, परंतु पुढच्या अधिक धीट अभिव्यक्तीसाठी त्यांनी एक भूमी तयार केली, असं मत संजय आर्वीकरांनी मांडलं आहे. अरुणा ढेरे यांनीही विजया राजाध्यक्षांबद्दल गौरवोद्‌गार काढताना लिहिलं आहे, की निर्मिती हे स्त्रीजीवनातले एक सुंदर रहस्य आहे, तसेच एकूण जीवनातले रहस्य आहे. या निर्मितिशीलतेचे आकर्षण विजया राजाध्यक्ष यांना कायम वाटत आले आहे. 'संधिकाल' या कथेत 'स्वशोधा'ची आस लागलेली कार्यकर्ती तारा आहे. साम्यवादी चळवळीत काम करणाऱ्या स्त्री-पुरुषांच्या संबंधांमध्येही 'पुरुषी' इगोमुळे निर्माण होणारा ताण विजयाबाईंनी टिपला आहे. 'पती, पिता, पुत्र' अशी मनुवादी स्त्रीसंरक्षणाची रूढ तटबंदी नाकारून आयुष्याच्या शेवटच्या टप्प्याला सूर्यकिरणांचा निरोप घेऊन संधिप्रकाशाच्या साथीने ती सामोरी जाऊ बघते आहे, असे एका नव्या स्त्रीचे चित्र त्यांनी या कथेत उभे केले आहे.

आशा बगे हे मराठी कथाविश्वामधले एक महत्त्वाचे नाव. 'मारवा', 'रुक्मिणी', 'हिवाळा', 'निर्मला' अशा त्यांच्या अनेक कथांमधून मनाचा ठाव घेणाऱ्या, वरून शांत-संयमी दिसणाऱ्या परंतु आत खोलवर सत्त्व सांभाळून असणाऱ्या स्त्रीव्यक्तिरेखा त्यांनी निर्माण केल्या आहेत. साठोत्तरी काळात स्त्रीमुक्ती विचाराने प्रभावित झालेल्या स्त्रीवादी पद्धतीच्या आविष्काराचा मोह टाळून त्यांनी पारंपरिक जीवनातही आधुनिकता जपणाऱ्या व्यक्तिरेखांची निर्मिती केली. विशेष म्हणजे आधुनिकता जपणाऱ्या या व्यक्तिरेखा त्यांना स्त्री आणि पुरुष या दोहोंमध्ये दिसू शकल्या. संजय आर्वीकरांनी आशा बगे यांच्या कथेची वैशिष्ट्ये उलगडली आहेत. ते म्हणतात, 'त्यांच्या कथांमधून चित्रित झालेले जगण्यातील सौंदर्य, एकमेकांच्या सहवासातून उमलणारे शहाणपण आणि झाडाला नैसर्गिक पालवी फुटावी अशी नैसर्गिक कथाविस्तारातील सहजता यामुळे त्यांच्या कथांतील माणसे खऱ्याखुऱ्या माणसांसारखी आपल्या मनात जगत असतात.'

सानिया या कालखंडाच्या मध्यात आपल्या संयत तरीही निश्चित प्रगल्भ जीवनदृष्टीसह लेखनातून घट्ट उभ्या राहिलेल्या आहेत. हेतुपूर्वकता, कृत्रिम बाज, आक्रमकता, शैलीची आकर्षकता यांपासून दूर राहून नैसर्गिक आविष्कारांसह आतल्या ओलाव्याने प्रकट होणारी ही लेखिका आहे. अरुणा ढेरे यांनी म्हटल्याप्रमाणे स्त्री हे केंद्र धरून स्वतःच्या अस्तित्वाचा शोध घेणारी; कोलमडणारी, तरीही स्वतःची शक्ती ओळखून उभी राहणारी आणि मानवी नातेसंबंधांना समंजसपणे स्वीकारणारी, सर्वसामान्य आयुष्यातली आव्हाने पेलणारी स्त्री त्यांच्या कथेत आढळते.

सानिया यांच्या व्यक्तित्वातील प्रांजळपणा त्यांच्या मुलाखतीत उतरला आहे. उदा. 'कथेचं माध्यम कसं वाटतं तुला? कधी अपुरं वाटतं का?' या मंगला आठलेकरांच्या प्रश्नावर त्या उत्तरतात, ''वाटतं ना! शब्दच अपुरे वाटतात. लिहायचं ते शब्दांत नीट मावत नाही असं वाटतं. कधी मनात चित्रपटासारखं दिसतं ते लिहून समाधान होत नाही. पण याला इलाज नाही. कथा हाताशी घेतल्यावर तिची काहीशी चौकट असणारच. लिखित शब्द हे माध्यम आहे, ते वापरून जितकं मांडता येईल तितकं करून पाहायचं.''

एक मोठा कालखंड समर्थ कथा लिहिणाऱ्या सानियांचं हे पारदर्शक आत्मचिंतन निश्चितच त्यांच्यातील सातत्याने स्वतःचा झाडा घेणाऱ्या, विचार करणाऱ्या लेखिकेचं दर्शन घडवणारं आहे. या खंडात त्यांची 'आमंत्रण' ही कथा आहे.

मराठी साहित्यातला साठोत्तरी हा काळ जसा एक महत्त्वाचा टप्पा आहे, तसाच त्यानंतरचा महत्त्वाचा टप्पा आहे नव्वदनंतरच्या साहित्याचा. खाऊजा संस्कृतीच्या आक्रमणाने ढवळून निघालेल्या इथल्या संस्कृती, विश्वाचे आकलन नव्वदोत्तरी कथा-कविता-कादंबऱ्यांमध्ये उत्स्फूर्तपणे आलेले दिसते. या कालखंडात स्त्रीलिखित कथांमध्ये मेघना पेठे, प्रतिमा जोशी, प्रतिमा इंगोले, प्रज्ञा पवार, नीरजा, मोनिका गजेंद्रगडकर अशी काही ठळक नावे दिसतात.

मेघना पेठे हे त्यातले एक अत्यंत महत्त्वाचे नाव आहे. माणूस म्हणून जगण्याचे, जीवनाचे इतके सूक्ष्म आणि स्पष्ट आकलन क्वचितच यापूर्वीच्या मराठी साहित्यात उमटले असेल. 'चिरपरिचित वाटांनी लग्नसंस्थेकडे किंवा स्त्रीपुरुष संबंधांकडे किंवा एकूणच समाजव्यवस्थेकडे पाहणारी त्यांची कथा नाही. जीवनाकडे पाहण्याचा या लेखिकेचा एक मनस्वी आणि न-नैतिक दृष्टकोन आहे,' हे अरुणा ढेरे यांनी नोंदवलेले निरीक्षण अचूक आहे.

मेघना पेठे ज्या थेटपणे अनुभवाला भिडतात तो थेटपणा चकित करणारा तर आहेच, कित्येक वेळा तो अंगावरही येतो. आपली सगळीच व्यवस्थेविषयीची, जीवनाविषयीची, नातेसंबंधांविषयीची समजूत कोलमडून पडावी असा जबरदस्त धक्का त्या देतात आणि वाचकाला अंतर्मुख व्हायला भाग पाडतात. अत्यंत सूक्ष्म विनोद, उपहास, उपरोध आणि तिरकस भाष्याचे फटके-झटके यांमधून आपल्या रूढ समजुतींमधले तकलादूपण उघडे करतात; मात्र, त्याच वेळी त्यांचा स्वर

एखाद्या कवितेइतका तरल, संवेदनशील आणि करुणामयही असतो.

या खंडातील मंगला आठलेकर यांनी घेतलेली मेघना पेठे यांची मुलाखत खरोखर मुळातून वाचावी अशी आहे. 'विचारांतील स्पष्टपणा, ते मांडण्याचे धाडस, सद्यकाळाचे अचूक आकलन यांचा प्रत्यय मेघना पेठे यांच्या मुलाखतीतून येतो. संजय आर्वीकर त्याविषयी म्हणतात, 'या मुलाखतीचे स्वरूप काहीसे संमिश्र आहे. संवाद-स्वगत आणि मुक्तचिंतनाचा संकर त्यात दिसतो. जगणे आणि लिहिणे यांचा परस्परसंबंध, लेखनाच्या प्रेरणा, बंडखोरी आणि स्वातंत्र्य, लोकांमधील प्रतिमा, माणसाचे एकटेपण-निराळेपण, नैतिकता, मूल्यचौकट, आधुनिकता, मृत्यू अशा अनेक महत्त्वपूर्ण पैलूंना ही मुलाखत स्पर्श करते.'

"कुठल्याही रस्त्यावर मी एकटी आणि पहिली नव्हते... मला मार्क्स द्यायचेच असतील तर ते प्रामाणिकपणाचे द्यावेत... हाच माझा स्वभाव असेल तर तसं वागण्यात मी कुठला मोठा तीर मारला?" असे उद्गार त्यांनी मुलाखतीत काढले आहेत, ते केवळ त्यांच्या विनयी वृत्तीचे नव्हे तर त्यांच्यातील वाङ्मयीन वस्तुस्थितीचे नीट भान असल्याचे आणि ते मान्य करण्याच्या त्यांच्या प्रामाणिकपणाचे द्योतक आहेत. प्रगल्भ वाटचाल केलेल्या साठोत्तरी कथेला (केवळ स्त्रीकथा नाही) मेघना पेठे यांनी खूप पुढे आणून ठेवले आहे, ही वस्तुस्थितीदेखील मान्य करावीच लागेल.

त्याचप्रमाणे या कालखंडात लिहित्या असणाऱ्या आणि आपला ठसा उमटवणाऱ्या रोहिणी कुलकर्णी, ऊर्मिला पवार, प्रतिमा जोशी, नीरजा आणि मोनिका गजेंद्रगडकर यांच्याही मुलाखती आणि कथा आपल्याला या खंडात वाचायला मिळतात.

विशेषतः मोनिका गजेंद्रगडकर यांच्या 'श्रद्धा' या कथेत आजच्या काळात हिंदू-मुस्लिम विद्वेषाचा स्वर किती चढा आणि तीव्र झाला आहे याचे भयावह दर्शन घडते. आंतरधर्मीय विवाह करून सामंजस्याने प्रगल्भ सहजीवन जगणाऱ्या सय्यद आणि यशोदा यांचा मुलगा अर्शद मात्र मदरसे आणि बाहेर भडकलेल्या धार्मिक विद्वेषाच्या घगीत अडकतो आणि द्वेषाची ही आग आपल्या हिंदू असलेल्या आईपर्यंत पोहोचवून तिलाही गजेंद्रगडकर यांनी केले आहे. मुलाखतीत निर्मितिप्रक्रियेविषयी बोलताना त्या म्हणतात, "कथेचं सुचणं हा माझ्या मते एक चकवाच असतो लेखकापुढचा. दुसरं असं, दिसलेला-भावलेला अनुभव दिसतो तसा फार एकरेषीय, एकांगी; पण त्याला अनेक सूक्ष्म पापुद्रे, स्तर, शक्यता, कोन, मिती असतात. जितकं खोल पाहू तितकी दृष्टी ऱ्हस्व होत जाते. हाताला लागतं ते कमीच. स्वतःमधल्या माणूसपणाचा नि लेखकपणाचा संघर्ष कथा सुचताना अखंड नि सुप्तपणे चालू असतो."

ऊर्मिला पवारांची वंदना बोकील यांनी घेतलेली मुलाखत बाईच्या जीवनातील वास्तवाचे दर्शन घडवणारी आहे. केवढ्या प्रतिकूल पसिस्थितीत ऊर्मिला पवारांनी शिक्षण घेतले आणि महत्त्वपूर्ण लेखन केले याचा सुंदर आलेख या मुलाखतीत आहे.

संजय आर्वीकरांनी प्रस्तावनेत या खंडात समाविष्ट असणाऱ्या लेखिकांसह मराठी स्त्रीकथा विश्वातील स्त्रीकेंद्री मुख्य आशयघटकांचा एक अभ्यासपूर्वक धांडोळा घेतला आहे, त्याचप्रमाणे सामाजिक जीवनात स्त्रीने मिळवलेले स्थान लेखिकांच्या कथावाङ्मयात पुरेसे प्रतिबिंबित झालेले नसल्याचे निरीक्षणही त्यांनी नोंदवले आहे.

स्त्रीलिखित कादंबरीविषयक प्रकाशित खंडात अरुणा ढेरे यांनी जी संपादकीय भूमिका मांडली त्याचा उल्लेखही आर्वीकरांनी केला आहे. १९व्या शतकाच्या उत्तरार्धातील स्त्रीविकासासाठी कर्त्या आणि लिहित्या प्रागतिकांची परंपरा आणि स्त्रीपुरुष समतेचा संविधानात्मक पाया रचणारी राज्यघटना यांचा हात धरून स्त्रीविकासाची क्षितिजे रुंदावत गेली आहेत आणि गेल्या साठ वर्षांत हळूहळू चित्र बदलत गेले आहे. लेखिकांचे लेखिकापण ही आता सर्जनशील माणूस म्हणून त्यांची अस्तित्वखूण बनली आहे.'

१९५० नंतरच्या स्त्रीलिखित कथांमध्ये जागोजागी सापडणाऱ्या अशा अस्तित्वखुणांचा शोध, हेच या खंडाचे उद्दिष्ट होते आणि ते संपादकीय भूमिका, लेखिकांच्या पारदर्शक मुलाखती आणि मूल्यनिर्णयात्मक प्रस्तावना यांच्या एकत्रित परिणामांतून साध्य झाले आहे, असे निश्चितपणे म्हणता येते.

◆

**अंजली कुलकर्णी**

स्त्रीलिखित मराठी कथा
(१९५०-२०१०)
संपादक : डॉ. अरुणा ढेरे
पद्मगंधा प्रकाशन
पृष्ठे : ६३२
मूल्य : ७०० रुपये



## मनोगत

राही डहाके

# 'चित्रलिपी'च्या अनुवादाचा प्रवास

आपण जन्मल्यापासून भाषा समजून घेतो, शिकू लागतो, मग बोलू लागतो. त्या प्रत्येक क्षणी आपण ऐकलेले शब्द भाषांतरित करीत असतो.

आपण ऐकलेले शब्द आणि आपल्याला समजलेले शब्द यातली जी दरी आहे, त्या दरीत वाहणारी नदी म्हणजेच भाषांतर आहे. इकडच्या तीरावर कधीही न येता सगळे समजून घेत आपण त्यात सहभागी होत असतो. साहित्य, सिनेमा, संगीत या कलांमध्ये हे अधिकच जाणीवपूर्वक होत जाते. आकलन म्हणजे आपण स्वतःच्या भाषेत केलेले रूपांतरच होय.

मला, का कोण जाणे, लहान असल्यापासून अधिक खोलवर जाणारी, गंभीर आशय असलेली कलाकृती मनापासून आवडली आहे. पटकन समजले तर मला त्यात रस वाटेनासा होतो. एखाद्या अनेक पदर असणाऱ्या विलक्षण फुलासारखी ती कलाकृती मला आतल्या मध्यापर्यंत जेव्हा पोचवते, तेव्हाच त्या गहनतेमुळे ती कलाकृती असल्याची मला खात्री पटते. अमूर्त आणि व्यामिश्र अशाच कलाकृतींकडे वळण्याचा माझा कल कदाचित अगदी लहानपणापासून वाचत, ऐकत, पाहत आलेल्या कलाकृतींमुळे वाढत गेला असेल.

मी इंग्रजी वाङ्मय हा विषय घेऊन एम. ए., एम. फिल. केले असले तरी घरच्या वातावरणामुळे मराठी वाचनाचे बोट कधीच सुटले नाही. याचे श्रेय मी आईला देते. कारण आयुष्याच्या प्रत्येक टप्प्यात अगदी तंतोतंत फिट बसणारे मराठी साहित्य ती माझ्यासमोर ठेवत गेली. बाबांनी काही भाषांतरित हिंदी, बंगाली आणि लॅटिन अमेरिकन, जर्मन, फ्रेंच भाषेतले साहित्य, विशेषतः युरोपियन नाटकांचे ढीग समोरच्या शेल्फांवर आणून ठेवले. हे भाषांतरित साहित्य वाचायला लागल्यावर आणि पुढे आपल्याला दोन भाषा बऱ्यापैकी येतात हे लक्षात आल्यावर एके दिवशी मी माझ्या भावाची एक कविता इंग्रजीतून मराठीत आणली. तिथेच हा शांत प्रवास सुरू झाला. मोजकी आणि आवडीपुरती केलेली अनेक भाषांतरे जशी केली तशीच लुप्त झाली.

जी. एं.च्या कथांचे भाषांतर करण्याची इच्छा मी कित्येक वर्षे मनात जपून ठेवली आहे. लहानपणी बखर बिम्मची; पुढे स्वतः वाचायला लागल्यावर कैरी, तुती, चैत्र या कथा आणि मग मराठीत खूपच काही तरी विलक्षण वाचल्याचा अनुभव त्यांची 'प्रवासी' ही कथा वाचल्यावर आला. हीच 'प्रवासी' कथा पस्तीस किलोमीटर पायपीट करून, हिमालयाच्या अद्भुत वातावरणात, अरुंद वाटांवर, अथांग फुलांच्या शेतांतून, बर्फाळलेल्या झऱ्यांतून स्वतः प्रवास करीत हर की दून येथे पोचल्यावर रात्रीच्या थकलेल्या अंधारात आम्हा पंचवीस प्रवाशांना बाबांनी सांगितली.

त्या वेळी आणि त्या प्रवासात मला माझे वडील कवी म्हणून दिसले. कदाचित आम्ही पहिल्यांदाच एवढा लांबचा प्रवास दोघांनी मिळून इतके दिवस इतर कवींबरोबर केल्यामुळे असेल. कदाचित माझे वय आणि समज आणि मनातला प्रवास मला हे सहज समजायला मदत करणारा ठरला असेल. कदाचित हिमालयाच्या त्या भव्य, विस्तीर्ण प्रदेशात आम्ही अतिशय लहान होऊन एकमेकांकडे बघू लागलो असू. माझ्या आईच्या कविता फार लहानपणापासून तिच्याबरोबर कविसंमेलने ऐकायला गेल्यामुळे ऐकल्या होत्या, त्या अधिक जवळच्या वाटत, पण मी त्या इंग्रजी भाषेत ऐकू शकत नसे. बाबांच्या कविता मात्र आपण मला अधिक जवळ वाटू लागलेल्या भाषेत आणाव्या असे पुष्कळ जुन्या काळापासून वाटत असे. पण भाषेवर पूर्ण विश्वास तेव्हाच बसला जेव्हा मी फ्रेंच, इटॅलियन, मोरोक्कन, पेरुवियन, ब्राझिलियन, पोलिश,



चेकोस्लोवाकियन, जपानी, ट्युनिशियन या भाषांमध्ये बोलणाऱ्या लोकांना इंग्रजी शिकवले. त्या वेळी पुष्कळदा आपण एक 'काउन्सेलर' (सल्लागार) आहोत आणि ते विद्यार्थी नसून बोलणे आणि समजून घेणे याची नितांत आवश्यकता असणारी माणसे - 'बीइंग्ज' आहेत असा अनुभव येत असे. तेव्हा वाटले, की आपल्याला जे समजते ते आपले असते. भाषा आपणच तयार करत असतो.

अचानक बाबांची कविता मला अधिक समजली, अधिक जवळची वाटली आणि ती मराठीपलीकडे नेऊन इतरांना द्यावी असे वाटले. हळूहळू मी एकेक कविता भाषांतरित करीत गेले. भाषांतराची कितीही शिबिरे करा, सेमिनारमध्ये भाग घ्या; कथा, कविता, नाटक, मनोगते, वृत्तपत्रातले लेख यांची भाषांतरे करा- प्रत्येक वेळी प्रत्येक साहित्यकृती ही स्वतःचे व्यक्तिमत्त्व घेऊन येते. त्यात इंग्रजी आणि मराठी या दोन संपूर्णतः दूर असलेल्या भाषा तर भाषांतरासाठी अधिकच कठीण. पण भाषांतर करीत असतानाचा जो विलक्षण अनुभव असतो तो नुसते लेखन किंवा नुसते वाचन यातून येत नाही. आपण स्वतः कविता लिहीत असूनही स्वतःचीच कविता भाषांतरित करताना एक नवीन कविता तयार झाल्याचा मला स्वतःला अनुभव आला आहे. लेखकाच्या कृतीचे भाषांतर करताना वाचन आणि आकलन होऊन स्वतःच्या शब्दांत, अनुभवात, जाणिवेत आपण स्वतः ते पुन्हा लिहीत असतो, हे जेव्हा समजले तेव्हा एकीकडे दैवी शक्ती आपल्या हातात आली असे वाटले आणि दुसरीकडे आपले भाषांतर नेहमीच अपुरे राहील, लेखकाला जे म्हणायचे आहे ते त्यात कधीच येऊ शकणार नाही, अशी हताश करणारी जाणीवही होत राहिली.

तरीसुद्धा राम पटवर्धनांचे 'पाडस' वाचून मी जितक्यांदा रडले तितक्याच वेळा ग. रा. कामतांनी भाषांतर केलेले 'रात्र थोडी सोंगं फार' वाचून मी हसले. नेरुदाच्या आणि समीच्या कविता, उदय प्रकाशची कथा, कुंदेराचे 'इम्मॉर्टॅलिटी', पामुकचे 'स्नो', बेकेटने स्वतः फ्रेंचमधून इंग्रजीत केलेले 'वेटिंग फॉर गोदो' ही पुस्तके काळजाला घरे पाडून गेली. बाबांनी भाषांतरित केलेले मार्क्वेझचे 'क्रॉनिकल्स ऑफ डेथ फोरटोल्ड' हे मी मराठीत वाचले तेव्हा हे एका कोलंबियन माणसाने भलत्याच भाषेत लिहिले आहे हे लक्षातही आले नाही.

बाबांच्या कविता भाषांतरित करताना मात्र तटस्थतेचा अनुभव येऊ शकला नाही. अनेकदा मराठीची हाडे मोडून इंग्रजीत अर्थ सापडेल या रीतीने ओळी रचाव्या लागल्या. काही वेळा मराठमोळे इंग्रजी हे 'चित्रलिपी' पुस्तक दूर ठेवून दोनेक महिन्यांनी नुसते इंग्रजीत वाचून पहिल्यावर बदलू शकले. खुद्द कवीलाच अर्थ विचारण्याची सोय मला होती, त्यामुळे उत्साह वाटला; पण कवीची नेहमीची पद्धत 'हो हो, चालेल, हरकत नाही', अशी. तेव्हा आईशी केलेली चर्चा उपयोगी ठरली. हे भाषांतर मी हळूहळू, शांतपणे करीत गेले; पण स्वतःच्या वडिलांच्या अनुभवांचे, विचारांचे, थकव्याचे, एकाकीपणाचे, प्रश्नांचे, समजावणीचे, शांतपणाचे भाषांतर करताना खूप वेगवेगळ्या भावनांचा अनुभव मी घेत गेले.

जे मी भाषांतरित केले आहे ते माझे आहे, जे कवीने लिहिले आहे ते कवीचे आहे, जे वाचक वाचणार आहे ते वाचकाचे आहे.

◆



**राही डहाके**
rahidahake@gmail.com





निवडक नवे

# नागरीकरणाने उद्ध्वस्त कृषिव्यवस्थेची अस्वस्थ कहाणी



भुई भुई ठाव दे
सीताराम सावंत
लोकवाङ्मयगृह
पृष्ठे : २५८
मूल्य : २७५ रुपये

शहरांची लोकसंख्या वाढू लागली तशी शहरे आजूबाजूच्या खेड्यांना कवेत घेत, तिथले लोकजीवनसंस्कृती यांना संपवत व्यापक होऊ लागली. स्वातंत्र्यानंतच्या काही दशकांत नागरीकरणाला नुकतीच कुठे सुरुवात होऊ लागली होती. तेव्हा कुणाला वाटलेही नसेल की पुढे त्याचे भयंकर परिणाम आपणास भोगावे लागतील; गावेच्या गावे, तिथली संस्कृती, प्राणी-पक्षी 'देशोधडीला' लागतील आणि माणसांचे माणूसपणही उरणार नाही. 'भुई भुई ठाव दे' या सीताराम सावंत यांच्या कादंबरीतून नागरीकरणाने उद्ध्वस्त केलेल्या कृषिव्यवस्थेची अशीच अस्वस्थ कहाणी आपणासमोर येते.

'नदीचं पाणी निर्मळ होतं, गुंठा गुंठा घटू लागला, हवेत धूळ व धूर मावेना, भुई गुदमरली सिमेंट. फर्शा न् डांबराने व भुई भुई ठावे दे' अशा पाच विभिन्न शीर्षकांनी सुरू होणाऱ्या घटकांमध्ये लेखकाने कादंबरीचे विभाजन केले आहे. शीर्षकाच्या माध्यमातून लेखक कृषिव्यवस्थेमध्ये होत जाणाऱ्या स्थित्यंतराकडे आपले लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतो. कधी काळी स्वच्छ हवा, निर्मळ पाणी इथल्या चराचरामध्ये भरून होते, परंतु माणसाच्या हव्यासाने इथली नैसर्गिकताच हरवून गेली. शेतीचे व्यापक क्षेत्र घटू लागले, प्रदूषण वाढले, नैसर्गिक जंगल नाहीसे होऊन सिमेंटचे जंगल वाढू लागले आणि कधी काळी अखंड असणाऱ्या जमिनीचे अनेक शकलांमध्ये मानवाने आपल्या स्वार्थापायी विभाजन घडवून आणले.

'हरिबा सणस' या अल्पभूधारक शेतकऱ्याची तीन मुले आणि नातवंडांची ही कहाणी. कोणत्याही शहराच्या औद्योगिक, शैक्षणिक, सांस्कृतिक विकासाची भूक वाढायला लागली की ते आपल्या आसपास असणारी गावे गिळंकृत करायला लागते. हरिबा सणस आणि त्याची तीन मुले अशाच एका विकसनशील शहराजवळ असणाऱ्या गावात राहत असतात. स्वातंत्र्यानंतर विकासाच्या संजीवनीचा नुकताच कुठे तरी जादुई स्पर्श होण्याचा हा काळ. परंतु विकासाने आपले अजस्र वाहू पसरायला सुरुवात करताच असंख्य प्रश्नांच्या गर्तेत सामान्य शेतकरी खेचला जाऊ लागला. त्याच्या रोजच्या जगण्यातील प्रश्नही उत्तरांविनाच राहू लागले.

स्वातंत्र्यानंतरच्या काही दशकांतच शहराजवळ असणाऱ्या जागांचे दर गगनाला भिडले. शहरालगत, रस्त्याकडेच्या या जागांचे दर गुणाकार पद्धतीने वाढू लागले. भविष्यातील फायदा डोळ्यांसमोर ठेवून ज्यांच्याकडे पैसा होता त्यांनी शहरालगत मिळेल तेथे चार गुंठे, दोन गुंठे अशा जागा घेण्याचा नवीनच फंडा विकसित केला. त्यामुळे पैसेवाले जागा विकत घेण्यासाठी सामान्य शेतकऱ्यांवर दबाव टाकू लागले, आमिषे दाखवू लागले. एकीकडे दिवसेंदिवस शेतीतील कमी होणारे उत्पन्न, तर दुसरीकडे जागा विकून शेतीतील उत्पन्नापेक्षा जास्त मिळणारे उत्पन्न, या चक्रव्यूहात सामान्य शेतकरी अडकला. कधी मोहाने तर कधी असहायपणामुळे परिस्थितिविवश, हताश होऊन तो जमिनी विकू लागला. आणि दिवसेंदिवस भूमिहीन होत जाऊ लागला. कृषिव्यवस्थेच्या या ऱ्हासाच्या मुळाशी इथल्या शासकीय अनास्थेपासून सामाजिक व्यवस्थेतील अराजकतेपर्यंत सर्वच घटक जबाबदार असूनही वर्षानुवर्षे बळी मात्र सामान्य शेतकऱ्याचा जात असलेला दिसून येतो. सीताराम सावंत प्रस्तुत कादंबरीतून शेतकऱ्यांच्या शोषणाला अत्यंत मुळातून भिडण्याचा प्रयत्न करतात.

शेतकरी, शेतमजूर यांचे प्रश्न मांडतानाच प्रस्तुत कादंबरी माफिया- बिल्डर यांचे हितसंबंध, बिल्डरांकडून सामान्य माणसांची सर्रास होणारी फसवणूक, बांधकाम व्यवसायातील शोषित मजूर, एजंटांचा सुळसुळाट आणि वेळप्रसंगी एखाद्याचे अस्तित्वही नामशेष करू पाहणारे आणि त्यात सराईतपणे यशस्वी होणारे क्रूर बिल्डर यांचा आणि बांधकाम व्यवसायातील अपप्रवृत्तींचाही गंभीर निर्देश करत प्रस्तुत कादंबरी आपणाला अस्वस्थ करते.

प्रस्तुत कादंबरी कोणत्याही एका मुख्य पात्राभोवती जरी केंद्रित झालेली नसली तरी सामान्य शेतकऱ्याचे जीवन या कादंबरीच्या केंद्रस्थानी राहते. कृषिव्यवस्थेचा नियमित सुरू असलेला ऱ्हास आणि जमिनीच्या गुंठेवारीने सामान्य शेतकऱ्याचे हरवून गेलेले जीवन याविषयी प्रस्तुत कादंबरी गंभीरतेने बोलते. समृद्ध आशय कवेत घेतानाच आशयाच्या मागणीतून येणारी प्रयोगशीलताही वाखाणण्याजोगी आहे. विशेषत: काही ठिकाणी होणारे भाषिक प्रयोग. उदा. विजूने अक्षरांची अदलाबदल करून उच्चारलेली काही वाक्ये नावीन्यपूर्ण आहेत. वाक्यातील लगतच्या दोन शब्दांच्या









अनुक्रमणिका

अद्याक्षरांची केलेली अदलावदल, उदा.'एक होता राजा' चं, 'एक राता होजा' असं.. किंवा. '..त्याची बायको खून छाप होती' याचं 'अचानक त्याची मेयको वाली' इ.

एकूणच, काळाचा व्यापक पट, निवेदनाची सरळ-सोपी परंतु अस्वस्थ करणारी शैली, अत्यंत सूक्ष्म तपशिलांनी जिवंत होणाऱ्या व्यक्तिरेखा, ग्रामीण आणि शहरी वातावरण नेमकेपणाने चित्रित करणारी आणि आशयास उन्नत करणारी भाषा आदी वैशिष्ट्यांनी सीताराम सावंत यांची 'भुई भुई ठाव दे' ही कांदबरी मनाचा नेमकेपणाने ठाव घेते. विकासाच्या गोंडस नावाखाली सामान्य शेतकऱ्यांचे होणारे शोषण प्रस्तुत कादंबरी गंभीर रीतीने आपल्यासमोर मांडते. कोणत्याही काळातील क्षण एकत्रित करून जाणून घेण्याचा प्रयत्न केला तर आपल्याला हेच लक्षात येते, की शेतकरी हा कोणत्याही काळात शोषितच राहिला आहे. काळ बदलला तरी त्याच्या जगण्याच्या गुणवत्तेत कोणताही फरक पडलेला नाही. उलट, प्रत्येक काळाच्या गतीवरोबर त्याची दु:खे व्यापक होत आहेत. व्यवस्थेकडून सातत्याने होणाऱ्या शोषणाचा गंभीर लसावि प्रस्तुत कादंबरी आपणासमोर ठेवते. शेती आणि शेतकरी आज सामाजिक विकासाच्या कोणत्या टप्प्यावर येऊन उभा आहे हे जाणून घेण्यासाठी आणि काळ्या मातीच्या मोहमयतेखाली सामान्य शेतकऱ्याचे निष्ठुरपणे चिरडले जाणे अस्वस्थतेने अनुभवण्यासाठी तरी आपण प्रस्तुत कादंबरी वाचली पाहिजे.

◆ डॉ. रविकांत शिंदे

चलभाष : ९४२३३१६४९०

## अष्टपैलू अभिनेत्याचं समर्थ दर्शन



प्राण
स्वप्निल पोरे
प्रतीक प्रकाशन
पृष्ठे : १४४
मूल्य : १५० रुपये

मराठीतील चित्रपटविषयक ललित गद्याच्या क्षेत्रात स्वप्निल श्रीकांत पोरे हे नाव आता चांगलंच स्थिर झालं आहे. 'दूर कोई गाए' या ग्रंथापासून पदार्पण केलेल्या पोरे यांचं तिसरं पुस्तक 'प्राण' नुकतंच प्रसिद्ध झालं.

हिंदी चित्रपटसृष्टीत प्राण यांचं स्थान अनन्यसाधारण होतं. तिथे राजेश खन्ना, अमिताभ वच्चनसारखे सुपरस्टार झाले ते नायकाची भूमिका अदा करून. प्राण हे एकमेव उदाहरण असं आहे की खलनायकाची भूमिका करूनही तो सुपरस्टार ठरला. असं का घडलं ही कारणमीमांसा सोपी नाही. त्यात पुष्कळ लहान-मोठे घटक आहेत. स्वप्निल पोरे यांनी प्रस्तुत ग्रंथात त्या सर्वांची केलेली उकल वाचताना आपण रंगून जातो. केवळ प्राणच्या अभिनयासंबंधीच नाही, तर गेल्या पन्नास वर्षांतली सगळीच चित्रपटसृष्टी या लेखनातून आपण अनुभवतो. आपल्या स्मरणरंजनाला सुंदर उजाळा देणारं असं हे मनोवेधक पुस्तक आहे.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे पडद्यावर हीरोऐवजी खलनायक होणं हा प्राणचा स्वत:चा निर्णय होता. त्याच्याच शब्दांत 'नायक होऊन झाडाभोवती नाचत फिरणं' त्याला मान्य नव्हतं. पण याच निर्णयामुळे त्याला अभिनयासाठी प्रदीर्घ कालखंड मिळाला. पोरे यांच्या सुंदर शैलीचा नमुना पाहा-

'पडद्यावर नायक-नायिकांच्या प्रेमात विब्बा घालण्याचं काम प्राणने केलं. प्रेमी युगुलांना एकत्र येऊ न देणं हे जणू आपलं जीवनव्रत असावं, या पद्धतीने प्राण प्रेमप्रकरणात मोडता घालत राहिला. अगदी वर्षानुवर्षं. अशोककुमारच्या जमान्यात तो होता. नंतर उदयाला आलेल्या दिलीपकुमार, राज कपूर, देव आनंद या त्रिमूर्तीला त्याने आपल्या कृष्णकारस्थानांतून सतावून सोडलं. नंतर मनोजकुमार, सुनील दत्त, राजेंद्रकुमार वगैरे नायकांची चलती होती त्या वेळी त्यांच्या मार्गात धोंड बनून उभा असणारा प्राणच होता. नायकांच्या पिढ्या बदलल्या, प्रेक्षकांच्या पिढ्या बदलत गेल्या, पण प्राण त्याच जागी! अगदी निष्ठेने तो नायक-नायिकांच्या रंगत असलेल्या आणि पूर्ण होण्याच्या दिशेने निघालेल्या प्रेमाचा डाव पार उघळून लावायचा.'

स्वप्निल पोरे केवळ भाष्य वा विधानबाजी करीत नाहीत, तर प्राणच्या अभिनयाची एकेक चित्रपट घेऊन सूक्ष्म चिकित्सा करतात. विशेषत: प्राणच्या देहबोलीचा त्याची भूमिका जिवंत होण्यात कसा महत्त्वाचा वाटा आहे याची त्यांनी केलेली चर्चा मोलाची वाटते. हा प्राणचा सर्वांगीण अभ्यास असल्याने त्याला संदर्भमूल्य असणारी परिशिष्टे जोडणे आवश्यक होते. तशी ती जोडली आहेत. 'प्राणवर चित्रित झालेली गाणी', 'प्राणचे गाजलेले संवाद', 'प्राणला मिळालेले पुरस्कार' आणि 'प्राणची भूमिका असलेले चित्रपट' ही परिशिष्टे परिपूर्ण आणि माहितीने अचूक आहेत. केवळ प्राणच्याच नाही तर एकूणच चित्रपटजगताच्या अभ्यासाच्या दृष्टीने हा ग्रंथ मौलिक झाला आहे. भरपूर छायाचित्रांमुळे त्याचे देखणेपणही वाढले आहे.

◆ प्रा. विश्वास वसेकर

भ्रमणध्वनी : ९९२२५२२६६८







महाराष्ट्र साहित्य परिषद

# मुख्य शाखा कार्यवृत्त

(दि. १ जून २०१५ ते ३१ ऑगस्ट २०१५)

**दि. २९ जून २०१५**

**दि. बा. मोकाशी जन्मशताब्दी व्याख्यान :**

या निमित्ताने डॉ. रेखा साने-इनामदार यांचे 'दि. बा. मोकाशी यांचे कथाविश्व' या विषयावर व्याख्यान झाले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले, तर दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**दि. ९ जुलै २०१५**

**प्रा. सोनोपंत दांडेकर पुरस्कार वितरण कार्यक्रम :**

डॉ. म. वि. गोखले पुरस्कृत प्रा. सोनोपंत दांडेकर पुरस्कार डॉ. मेघा खासगीवाले यांच्या 'आत्म्याचा प्रवास आणि मृत्युपश्चात जीवन' या पुस्तकाला डॉ. रामचंद्र देखणे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. या पुरस्कारासाठी परीक्षक म्हणून डॉ. तेज निवळीकर आणि डॉ. मंगला चिंचोरे यांनी काम पाहिले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**दि. १४ जुलै २०१५**

**प्रा. बाबूराव व शांतादेवी शिरोळे पारितोषिक वितरण कार्यक्रम :**

यंदाचे प्रा. बाबूराव व शांतादेवी शिरोळे पारितोषिक हेमा लेले व प्रतिभा रानडे यांना डॉ. मंदा खांडगे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले. या वेळी डॉ. माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे, सुनील महाजन उपस्थित होते. पुरस्कारप्राप्त लेखकांनी आपापली मनोगते व्यक्त केली. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रतिभा रानडे यांच्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखविला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी केले.

**दि. १५ जुलै २०१५**

**जी. ए. कुलकर्णी जयंती कार्यक्रम :**

या निमित्ताने संजय भास्कर जोशी यांचे 'जी. ए. कुलकर्णी आणि एकविसावे शतक' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी डॉ. माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे आदींची उपस्थिती होती. दीपक करंदीकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**दि. २१ जुलै २०१५**

**लोकशाहीर अण्णा भाऊ साठे स्मृतिदिन :**

या निमित्ताने डॉ. श्रीपाल सबनीस यांचे 'अण्णा भाऊ साठेप्रणित समाजक्रांती' या विषयावर व्याख्यान झाले. सम्यक् साहित्य परिषदेच्या सहयोगाने हा कार्यक्रम करण्यात आला. या वेळी सम्यक साहित्य परिषदेचे दुर्योधन अहिरे, मसापच्या कार्याध्यक्षा डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे उपस्थित होते. दीपक करंदीकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**दि. १० ऑगस्ट २०१५**

**वि. शं. रानडे स्मृती पुरस्कार वितरण :**

शकुंतला क्षीरसागर पुरस्कृत उत्कृष्ट कथासंग्रहास दिला जाणारा हा पुरस्कार डॉ. अरविंद संगमनेरकर यांच्या 'लग्नाच्या गोष्टी' या संग्रहास डॉ. शा. बं. मुजुमदार यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी मुजुमदार व संगमनेरकर यांचा परिचय करून दिला. वि. शं. रानडे यांच्याविषयी त्यांच्या भगिनी शुभदा कुंटे यांनी भावना व्यक्त केल्या. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले, तर प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

**दि. १३ ऑगस्ट २०१५**

**संत सावता माळी पुण्यतिथी :**

मसाप व संस्कृती प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने सावता माळींच्या जीवनकार्यावर आधारित श्रीनिवास वारुंजीकर लिखित नाटकाचा प्रकाशन समारंभ प्रा. यशवंत पाठक यांच्या हस्ते झाला. या वेळी श्रीनिवास वारुंजीकर, डॉ. राजेंद्र माने, बाळासाहेब शिवरकर, यशवंत पाठक यांनी मनोगत व्यक्त केले. प्रकाश पायगुडे यांनी स्वागत, सुनीताराजे पवार यांनी प्रास्ताविक, तर दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**दि. १७ ऑगस्ट २०१५**

**डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिदिन :**

डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृती पुरस्कार प्रा. यास्मिन शेख यांना प्रा. शेषराव मोरे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. भानू काळे यांनी प्रा. यास्मिन शेख यांच्याविषयीच्या भावना व्यक्त केल्या. या वेळी प्रा. शेख, पराग जोगळेकर, प्रा. मोरे यांनी मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी, सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले, तर आभार प्रकाश पायगुडे यांनी मानले.

**दि. १९ ऑगस्ट २०१५**

**डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतीव्याख्यान :**

या निमित्ताने चाणक्य मंडळाच्या अथर्व देसाई, राहुल रामपूरकर, राहुल मोहिते, अजिंक्य आपके यांचे 'मला उमगलेले सावरकर' या विषयावर व्याख्यान झाले. चौथे विश्व मराठी साहित्य संमेलन अंदमान येथे होत असल्याच्या पार्श्वभूमीवर या वेळी संस्कार भारतीच्या सदस्यांनी सावरकरांची विविध गीते सादर केली. या वेळी डॉ. माधवी वैद्य, शीतल बापट, डॉ. उज्ज्वला जोगळेकर, डॉ. कल्याणी दिवेकर यांची उपस्थिती होती. ◆



## शाखा कार्यवृत्त

(दि. १ जून २०१५ ते ३१ ऑगस्ट २०१५)

**फलटण शाखा**

**दि. १७ ऑगस्ट २०१५**

'पाठ्यपुस्तकातील लेखक आपल्या भेटीला' हा कार्यक्रम वाजेगाव (ता. फलटण) येथील कर्नल ॲकेडमी सभागृह व फलटण एज्युकेशन सोसायटीच्या मुधोजी हायस्कूलमध्ये झाला. नीरजा, संगीता बर्वे, इंदुमती जोंधळे या लेखिका निमंत्रित म्हणून उपस्थित होत्या. मसाप फलटण शाखेचे अध्यक्ष डॉ. मधुकर जाधव कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. कोषाध्यक्ष बापूसाहेब मोदी यांनी प्रास्ताविक, कार्याध्यक्ष प्रा. रवींद्र येवले यांनी परिचय व स्वागत केले, तर कार्यवाह प्रा. विक्रम आपटे यांनी आभार मानले. या दोन्ही कार्यक्रमांना विद्यार्थ्यांचा खूप चांगला प्रतिसाद मिळाला.

**नाशिक रोड शाखा**

**दि. १६ ऑगस्ट २०१५**

मसाप, संवाद, श्यामची आई फाउंडेशन, अ. म. रा. शैक्षणिक कलाशिक्षक संघ यांच्या संयुक्त विद्यमाने बाबूराव पेंटर, दीनानाथ दलाल यांच्या जन्मशताब्दीनिमित्त शालेय विद्यार्थ्यांसाठी राज्यस्तरीय रंगभरण व सुंदर हस्ताक्षर स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. या वेळी दत्ता गायकवाड, द. वा. मुळे यांनी मनोगत व्यक्त केले. पाहुण्यांचा सत्कार रवींद्र मालुंजकर, प्रसाद पवार, सुदाम सातभाई, मधुकर गायकवाड, कृष्णा कुंदे यांच्या हस्ते करण्यात आले. या स्पर्धेसाठी कलाशिक्षक संघातर्फे शिक्षकांचा मेळावा घेण्यात आला.

**सोलापूर शाखा**

**दि. ८ नोव्हेंबर २०१४**

'एक कथा, एक कविता' हा कार्यक्रम शाखेच्या वतीने आयोजित करण्यात आला. डॉ. इरेश स्वामी यांनी कथा, तर हेमकिरण पत्की यांनी कवितांचे सादरीकरण केले. अपर्णा सहस्रबुद्धे यांनी भारुडातून प्रबोधन केले.

**दि. १७ ते १९ डिसेंबर २०१४ : व्याख्यानमाला**

या काळात शाखेच्या वतीने व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. डॉ. सदानंद मोरे यांचे 'संतसाहित्य : काल, आज आणि उद्या' या विषयावर, अवधूत परळकर यांचे 'काळाची आव्हाने' या विषयावर, तर फय्याज शेख यांचे 'माझी रंगभूमीवरील ५० वर्षांची वाटचाल' या विषयावर व्याख्यान झाले.

**शुद्धलेखन शिबिर**

शाखेच्या वतीने आयोजित शुद्धलेखन शिबिरात माधव राजगुरू, अरविंद जोशी यांनी मार्गदर्शन केले. या वेळी संजीव पिंपरकर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. डॉ. सुहास पुजारी कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. राजेंद्र भोसले यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**दि. २७ फेब्रुवारी २०१५ : कुसुमाग्रज जयंती**

या निमित्ताने डॉ. राजशेखर हिरेमठ यांनी कुसुमाग्रज भेटीतील अनुभवकथन केले. या वेळी आशा बगे यांच्या 'निवडुंग' या कथेचे अभिवाचन झाले. या कार्यक्रमात शशिकांत लावणीस, वनिता म्हैसकर, सारिका अग्निहोत्री, विद्या लिमये, रणजित अभ्यंकर, श्रीरंग सराफ यांनी सहभाग घेतला. वंदना कुलकर्णी यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

**दि. १७ जुलै २०१५ : कवी कालिदास जयंती**

या निमित्ताने आयोजित कार्यक्रमात नितीन वैद्य, स्नेहा शिनखेडे, रजनीश जोशी यांनी 'मला भावलेले पुस्तक' या विषयावर आपले विचार मांडले. डॉ. सुहास पुजारी कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक बाबूराव मैंदर्गीकर यांनी, सूत्रसंचालन अ‍ॅड. जे. जे. कुलकर्णी यांनी, तर आभारप्रदर्शन राजेंद्र भोसले यांनी केले.

**दि. १ ऑगस्ट २०१५ :**
**लोकमान्य टिळक व अण्णा भाऊ साठे जयंती कार्यक्रम :**

या निमित्ताने प्रा. डॉ. श्रीकांत येळेगावकर यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक बाबूराव मैंदर्गीकर यांनी, सूत्रसंचालन मारुती कटकधोंड यांनी, तर आभार प्रदर्शन राजेंद्र भोसले यांनी केले.

**दि. १३ ऑगस्ट २०१५ :**
**आचार्य अत्रे जयंती कार्यक्रम :**

मीना गोळे व इना काटकर यांच्या सहकार्याने 'कृष्णकिनारा' या डॉ. अरुणा ढेरे यांच्या कादंबरीचे अभिवाचन शशिकांत लावणीस, वनिता म्हैसकर, विद्या लिमये यांनी केले. तसेच या वेळी राजेंद्र भोसले यांच्या 'छबिना' या कथासंग्रहाचे प्रकाशन डॉ. सुहास पुजारी यांच्या हस्ते झाले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक बाबूराव मैंदर्गीकर यांनी, सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी यांनी, तर आभारप्रदर्शन वदी उज्जमा बिरादार यांनी केले.

**जुळे सोलापूर शाखा**

**दि. २४ जुलै २०१५ : कवी कालिदास जयंती :**

'आषाढ कवितांचा' या कार्यक्रमांतर्गत नारायण कुलकर्णी, माधव पवार, मारुती कडकधोंड, निर्मला मठपती, डॉ. नसिमा पठाण, गिरीश दुनाखे. जॉन येवलेकर, प्रा. रूपाली येवलेकर, रेणुका महागावकर, शांता क्षीरसागर या कवींनी आपल्या कविता सादर केल्या. माधव पवार यांनी सूत्रसंचालन केले. अध्यापिका महाविद्यालयातील नवोदित कवयित्रींनी या वेळी आपल्या कविता सादर केल्या. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. वासुदेव रायते यांनी, तर आभारप्रदर्शन प्रशांत जोशी यांनी केले.

**दि. २२ ऑगस्ट २०१५ : श्रद्धांजली सभा :**

माजी राष्ट्रपती डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम, भालचंद्र पेंढारकर, ऊर्मिला शहा, वसंतराव भागवत यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी डॉ. वासुदेव रायते यांच्या अध्यक्षतेखाली सभा आयोजित करण्यात आली होती.

**दि. ३ सप्टेंबर २०१५ :**

आशा बगे यांच्या 'निवडुंग' या कथेचे अभिवाचन 'जवळीक' या संस्थेतर्फे करण्यात आले. नारायण कुलकर्णी यांच्या हस्ते अभिवाचकांचा सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक व आभारप्रदर्शन डॉ. वासुदेव रायते यांनी केले.

◆

**प्रकाश पायगुडे** (प्रमुख कार्यवाह)
संकलन : **दीपक करंदीकर**

# मन:पूर्वक अभिनंदन!



मराठी कादंबरी क्षेत्रात आपल्या प्रयोगशीलतेने मौलिक अशी भर घालणारे ज्येष्ठ लेखक श्याम मनोहर यांना प्रसिद्ध कन्नड कवी, नाटककार, कथालेखक आणि टीकाकार कुप्पळ्ळी वेंकटप्पा पुट्टप्पा अर्थात कुवेंपु यांच्या नावाने दिला जाणारा प्रतिष्ठेचा राष्ट्रीय पुरस्कार जाहीर झाला आहे. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन.



मराठी बालसाहित्यात दिलेल्या मौलिक योगदानासाठी ज्येष्ठ लेखक लीलाधर हेगडे यांना यंदाचा साहित्य अकादमी पुरस्कार जाहीर झाला आहे. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन.



तरुण आश्वासक कवी वीरा राठोड यांना साहित्य अकादमीचा यंदाचा युवा साहित्यिक पुरस्कार जाहीर झाला आहे. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन.

बुक-पोस्ट


प्रेषक

प्रमुख कार्यवाह,

**महाराष्ट्र साहित्य परिषद,**

टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.

दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : September 2015

Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57

Book Pkt. Periodical Category


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

